


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ७० । अंक ६ । मार्च २०१७
फाल्गुन/चैत्र शके १९३८
वार्षिक वर्गणी ४०० रुपये
या अंकाची किंमत रु. ४०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
नीता गायकवाड
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने या नियतकालिकाला अनुदान दिले असले तरी या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्य शासन सहमत असेलच, असे नाही.

अनुक्रमणिका








# नवभारत

**मार्च २०१७**

## अनुक्रमणिका

**व्यक्ती, प्रसंग आणि आठवणी :**

# डॉ. सुलभा ब्रह्मे : अविश्रान्त धडपड

दीर्घस्मृती

म्हातारपण आले की, शरीराला नाना व्याधी जडतात. औषधांचा वापर सुरू होतो. निरनिराळी पथ्ये पाळावी लागतात. हिंडणे-फिरणे कमी होते. हे सगळे सोसणे भागच असते. आणखी एक दुःखाची गोष्ट असते, ती म्हणजे आप्त आणि मित्रमंडळींपैकी कुणाच्या ना कुणाच्या तरी मृत्यूची वार्ता गेल्या वर्षा-दोन वर्षात अनेक सहका-यांच्या व सहप्रवाश्यांच्या मरणांच्या बातम्या आघात करून गेल्या. मी प्राध्यापकांच्या संघटनेत पंचविसाहून जास्त वर्षे काम केले. त्या चळवळीतीत माझे किती तरी सहकारी अलीकडे वारले. त्यांच्या बरोबर झालेल्या चर्चा, झगडे, चळवळी, संप, प्रवास, परिषदा यांच्या आठवणी आल्या की, उसासे सोडण्यावाचून आपल्याकडे दुसरे काहीच नसते. ओळखी नाना प्रकारच्या असतात. उद्योग-व्यवसायामुळे होतात, समान छंद असल्यामुळे जुळतात, परिसरातच राहात असल्याने घडून येतात. पण मैत्रीची खरी ऊब चळवळीतल्या धकाधकीत जो साथीदार असतो त्याच्या सहवासात आणि आठवणीत अनुभवायला मिळते, डॉ. सुलभा ब्रह्मे १ डिसेंबर २०१६ या दिवशी वारल्या. मी 'गोखले अर्थ व राज्यशास्त्र संस्थे'च्या (गोखले संस्था) ग्रंथालयात असतानाच ती बातमी आली. मी त्यांना 'ब्रह्मेबाई' म्हणून ओळखत असे. ब्रह्मेबाईंचे आणि गोखले संस्थेचे अतिशय जिव्हाळ्याचे नाते होते. संस्थेचा इतिहास, तिची सध्याची स्थिती आणि भविष्यातील विकासाच्या योजना यांचा खल त्यांच्या मनात सतत चालत असे. संस्थेतील अधिकारी व्यक्तींशी त्यांचा वेळोवेळी झगडा होई. अशाच एका भांडणाच्या संदर्भात बाईंची व माझी ओळख झाली. नंतर ती ओळख वाढतच गेली. संस्थेच्या वाटचालीच्या एका वळणावर मोठाच बिकट प्रसंग ओढावला तेव्हा बाईंनी मला पुनः त्या कामात ओढून नेले. पण बाईंची व माझी ओळख म्हणा, मैत्री म्हणा गोखले-संस्थेच्या कामापुरतीच मर्यादित नव्हती. नाना विषयांवर आमच्या चर्चा चालत. मतभेदही होई-बाईंचा स्वर पुष्कळदा आग्रही असे आणि समोरच्याचा 'पाडाव' करण्यासाठी त्या बोलत आहेत अशी ति-हाइताची समजूत होण्याला वाव असे, पण मला माहीत होते की, बाई अगदी सरळ स्वभावाच्या आणि सगळ्यांचा मान ठेवून व शिष्टाचार पाळून बोलणा-या होत्या. आग्रहीपणाचे कारण दुस-या विषयीची तुच्छताबुद्धी हे नसून चर्चेच्या विषयाबद्दलची आत्मीयता, हे असे.

बाई माझ्याहून ९-१० वर्षांनी मोठ्या होत्या. अभ्यास, अनुभव, चळवळीत सहभाग या सगळ्याच अंगांनी त्यांचा अधिकार फार मोठा होता. त्यांनी जगभर प्रवास केला होता, मोठमोठ्या व नामांकित विद्यापीठांना त्यांनी भेटी दिल्या होत्या व तेथील ज्ञानी प्राध्यापकांशी त्यांच्या चर्चा झाल्या होत्या. महाराष्ट्र बँकेच्या संचालक मंडळावर त्या काही काळ होत्या. फार उच्च पदावर पोचलेल्या व्यक्तींशी त्यांची चांगली ओळख होती. पण मी आणि माझ्यासारख्या किती तरी सामान्य व साध्यासुध्या व्यक्तींशी त्यांची वागणूक अगदी खेळीमेळीची असे. त्यात कसल्याच प्रकारचा दयाळूपणाचा (कन्डेसेन्शन) अविर्भाव नसे. तीन-चार वर्षांपूर्वी त्यांच्या पायांना काही विकार झाला व त्यांना चालणे आणि जिना चढणे कठीण जाऊ लागले. नाहीतर, तोपर्यंत त्या माझ्या घरी दर आठ-पंधरा दिवसांनी येत. पाऊण तास किंवा तासभर निरनिराळ्या विषयांची चर्चा होई. त्यात गोखले संस्थेतील कोणता तरी प्रश्न असेच. नंतर त्या चालत गोखले संस्थेकडे जात. चालण्याचा त्यांना कंटाळा नसे. पाय थकल्यावर मात्र त्यांना कुणीतरी दुचाकी-स्वार घेऊन जात असे. त्यांनी रिक्षा केल्याचे मी एकदाच पाहिले आहे.

बाईंच्या मनात सतत कोणत्या ना कोणत्या प्रश्नांविषयी खळबळ चाललेली असे. विद्यापीठाच्या

अनुक्रमणिका








रस्त्यावरील झाडे तोडण्यापासून तो इराकवर अमेरिकेने केलेल्या हल्ल्यांपर्यंत प्रत्येक घटनेकडे त्या त्यांच्या 'पुरोगामी' दृष्टिकोनातून पहात. प्रत्येक झगड्यात कोणती तरी बाजू निखालस अन्याय करणारी व विरुद्ध बाजू त्या अन्यायाला बळी पडणारी असते; आणि अशा परिस्थितीत बळीचा कैवार घेणे हे आपले कर्तव्य ठरते, अशी त्यांची स्वच्छ भूमिका असे. कोण जुलमी आहे व कोण पिळला जातो आहे, यांची ओळख त्यांना ताबडतोब पटत असली तरी प्रत्येक प्रश्नांची त्या भरपूर माहिती गोळा करत आणि त्यावर माहिती देणारी पुस्तिका काढत. गेल्या पंचवीस वर्षांत त्यांनी पंधरा-वीस तरी उद्बोधक पुस्तिका काढल्या होत्या. काश्मिरी जनतेवर होणा-या लष्करी आणि पोलिसांच्या दमनकांडावरची त्यांची पुस्तिका अस्वस्थ करणारी होती.

पण काही समस्या अशा असत की, नुसते पत्रक किंवा पुस्तिका काढून स्वस्थ बसणे बाईंना पटत नसे. तेथील दांडग्या लोकांच्या विरोधात काही तरी चळवळ करण्याची जरूर असे. जैतापूरची अणुवीजभट्टी किंवा एन्रॉनच्या गॅसच्या सहाय्याने वीज निर्माण करण्याचा प्रकल्प यांच्या विरोधात चळवळ केली पाहिजे असा संकल्प केल्यानंतर बाईंनी अविश्रान्त धडपड केली. तृणमूलस्तरावरील रयतेपासून तो शिखरस्थ अधिकारी माणसांपर्यंत सर्वांचा पाठिंबा मिळवण्याचा त्यांनी सातत्याने प्रयत्न केला. पत्रके, पुस्तिकांसाठी माहिती गोळा करण्याकरता त्यांनी कुठे-कुठे खेटे घातले त्याची गणतीच नाही. 'लोकायत'मध्ये कार्यकर्त्यांच्या बैठका झाल्या.
रा. प. नेने, प्रा. शिरोळकर, प्रा. मुर्तीकर, मुक्ता मनोहर, कॉ. अजित अभ्यंकर, दत्ता देसाई अशा कार्यकर्त्यांद्वारे चळवळ उभी राहिली. अखेर पुण्याहून दाभोळला स्वयंसेवक नेऊन निदर्शने करण्याचा प्रसंग आला. तेव्हा दाभोळला सर्वांची रहाण्याची कशी व्यवस्था करायची याची तपशिलवार योजनाही त्यांनी तयार केली. अशी धडपड करण्याचा उत्साह साठी उलटल्यानंतरही बाईंच्या ठिकाणी होता.

बाईंच्या या हालचालींची माहिती मला त्यांच्याच बोलण्यातून मिळायची. चळवळीत मी सामील झालो नाही. मी त्यात भाग घ्यावा असा आग्रह ही बाईंनी कधी धरला नाही. मी त्यांना कधी लेख लिहून देणे, कधी कल्पना सुचवणे, वारंवार चर्चा करणे या मार्गांनी मदत करीत असे. मध्ये काही वर्षे 'ज्ञानविज्ञानजथ्या' साठी त्या कॅलेंडर तयार करीत असत. त्या कॅलेंडरवर विज्ञान, गणित अशा विषयांवर शास्त्रज्ञांची चित्रे छापून शास्त्रज्ञांची माहिती सांगणारे लेख दिलेले असत. असे लेखही मी लिहिले होते.

(१)

अशा चळवळीत बाई मनापासून भाग घेत होत्या हे खरेच होते. पण बाईंच्या अंतरंगातील जिव्हाळ्याचा विषय म्हणजे 'गोखले संस्था' गोखले संस्थेची जोपासना, तिचा विकास, तिचे ध्येय-धोरण या सर्वांची काळजी वहाणे, हा त्यांचा धर्म होता. गोखले संस्थेशी त्यांचे तीन पिढ्यांचे नाते होते. त्याचे आजोबा (आईचे वडील), साता-याचे रावबहादुर काळे, यांनी 'सर्व्हंट्स् ऑफ इंडिया सोसायटी' (भारत सेवक समाज) या नामदार गोखल्यांनी सुरू केलेल्या सेवाभावी संस्थेला १९३० च्या जागतिक मंदीच्याकाळात एक लाख रुपयांची उदार देणगी देऊन अर्थ व राज्यशास्त्र या विषयात संशोधन करणारी संस्था काढण्याचा अभिनव प्रस्ताव दिला. भारत सेवक समाजाचा उद्देशही अर्थशास्त्र, राज्यशास्त्र, प्रशासन यांच्या क्षेत्रात अनुभवातून आणि अभ्यासातून प्रशिक्षित झालेले कायेकर्ते तयार करण्याचा होता. त्यामुळे भारत सेवक समाजाने ही जबाबदारी घेतली.

बाईंचे वडील, डॉ. धनंजयराव गाडगीळ हे केंब्रिज विद्यापीठातून अर्थशास्त्रात एम. लिट् ही पी. एचडी. च्या तोडीची पदवी मिळवून परत आले होते. त्यांना विलायतेला पाठविताना घरच्या लोकांची अपेक्षा होती की, ते आय्. सी. एस्. होऊन येतील. पण डॉ. गाडगीळांनी विलायतेतूनच वडिलांना कळवले की, आपण ती परीक्षा देऊन सरकारी नोकरीत जाणार नाही. परत आल्यावर त्यांना मोठ्या पगाराची नोकरी मुंबई प्रांताच्या सरकारात मिळाली होती. ती काही वर्षांनी सोडून ते सुरतेच्या महाविद्यालयाचे प्राचार्य झाले. गोखले संस्थेची स्थापना होताच प्राचार्यपद सोडून ते तेथील वेतनाच्या निम्म्या वेतनावर संस्थेत संचालक म्हणून नोकरीला आले. संस्थेची जोपासना करण्यासाठी डॉ. गाडगीळांनी मोठा

त्याग केला.

बाईंना वडलांचा फार अभिमान होता. त्यांनी त्यांचे उत्कृष्ट चरित्र लिहिले आहे. भारतीय अर्थशास्त्राचे त्यांचे ज्ञान, संस्थेच्या वाढीला उपकारक होतील असे निर्णय घेताना त्यांनी दाखवलेली धिटाई, खालच्या स्तरावरील प्रजेचे कल्याण कसे साधेल आणि त्यांना वाटणारी कळकळ, अर्थशास्त्रीय सिद्धान्तांच्या विश्लेषणात गुंतण्यापेक्षा सरकारी धोरण ठरवताना उपयोगी पडेल अशी माहिती सर्वेक्षणातून मिळवण्यासाठी संस्थेचा उपयोग व्हावा यावर त्यांनी दिलेला भर अशा त्यांच्या गुणांविषयी त्या कायम आदराने बोलत. डॉ. गाडगीळांच्या मृत्यूनंतर संस्थेची धोरणे बदलत आहेत, अशी खंत त्यांना वाटे. उदा., गोखले संस्थेने अर्थशास्त्राचा एम. ए. चा अभ्यासक्रम तयार करून तो शिकवण्याचे वर्ग चालवले, ही गोष्ट बाईंना अजिबात आवडली नव्हती. संस्थेत प्राध्यापक असलेले डॉ. नी. वि. सोहनी यांनी (निवृत्तीनंतर) डॉ. गाडगीळांचे एक चरित्र लिहिले. ते गाडगीळांविषयी उचित आदराने लिहिले असले, तरी गाडगीळांच्या काही निर्णयांवर त्यात टीका केली होती. त्या चरित्राविषयीचा तिटकारा ब्रह्मेबाईंच्या बोलण्यातून व्यक्त होई.

खुद्द ब्रह्मेबाई अर्थशास्त्र हाच विषय घेऊन एम. ए. झाल्या. नंतर त्यांनी गोखले संस्थेतूनच (मला वाटते) पुण्यातील कापड व्यापाराचे सर्वेक्षण करून प्रबंध लिहिला. त्यासाठी त्यांना पीएच. डी. ही पदवी मिळाली. नंतर त्या संस्थेतच नोकरीला लागल्या व तेथूनच निवृत्त झाल्या. अशा रीतीने, वर म्हटल्याप्रमाणे, तीन पिढ्यांच्या संबंधांमुळे बाई संस्थेशी अगदी एकरूप होऊन गेल्या होत्या. त्यांच्याशी चर्चा करताना कित्येकदा असा संशयही मनात येई की, संस्थेवर आपला विशेष अधिकार आहे, असे त्यांना वाटत असावे. पण बाईंची एकूणच उदार विचारसरणी पाहता अशी शक्यता फारच कमी होती. जिव्हाळा, आपुलकी व एक प्रकारचे वात्सल्य अशा भावनांच्या गुंतागुंतीतून व त्या भावनांच्या उत्कटतेमुळे संस्थेविषयी बोलताना काहीसा अनुदार आग्रहीपणा त्यांच्या बोलण्यात डोकावत असे.

गोम अशी होती की, गोखले संस्थेचा कारभार भारत सेवक समाजाच्या हाती होता. कारभार पाहाण्यासाठी संस्थेच्या घटनेत एका कारभारी-मंडळांची योजना केली होती. भारत सेवक समाजाचे (समाज) अध्यक्ष हे या कारभारी-मंडळाचे अध्यक्ष असत. खेरीज समाजाचे आणखी तीन सभासद कारभारी मंडळाचे सभासद असत. शिवाय विद्यापीठ अनुदान मंडळाचा प्रतिनिधी, महाराष्ट्राचे शिक्षण-संचालक हेही मंडळावर असत. संस्थापकांचे प्रतिनिधी म्हणून काळे-विश्वस्त-संस्थेचा प्रतिनिधी असे. संस्थेचे संचालक, संस्थेतील शिक्षकांचा प्रतिनिधी असे आणखी सदस्य होते. माझा संस्थेशी संबंध आला तेव्हा (१९८९ साली) ब्रह्मेबाईंच्या आई, प्रमिलाबाई गाडगीळ, संस्थापक-प्रतिनिधी म्हणून मंडळावर होत्या. पण त्या आजारी असल्याने सभेस जाऊ शकत नसत.

डॉ. गाडगीळ संस्थेचे संचालक होते तेव्हा त्यांच्या विद्वत्तेचा दबदबा, त्यांनी समाजात केलेले काम, सरकार-दरबारी त्यांचे असलेले वजन या कारणांमुळे त्यांच्या मताप्रमाणेच सहसा कारभार चाले. शिवाय 'समाजा'चे धुरीणही समजूतदार, उदारमतांचे व जुळवून घेणारे असत. तरीही 'आम्ही डॉ. गाडगीळांचे सगळेच म्हणणे ऐकून घेत असू, असे नाही', असे मला 'समाजाचे' पुण्यातील प्रतिनिधी डॉ. काकडे यांनी सांगितले. डॉ. काकडे हे डॉ. गाडगीळांचे विद्यार्थी होते. ते ब्रह्मेबाईंना गुरुभगिनी मानत असत. डॉ. काकडे म्हणाले की, 'डॉ. गाडगीळांची योजना-आयोगाचे उपाध्यक्ष म्हणून नेमणूक झाली व त्यांनी संस्थेचे संचालकत्त्व सोडण्याची वेळ आली, तेव्हा आपल्यानंतर प्रा. वि. म. दांडेकर यांची संचालकपदी नेमणूक करावी अशी त्यांची शिफारस होती. आम्ही ती शिफारस स्वीकारली नाही व प्रा. माथूर यांची नेमणूक करण्याचे ठरवले. तेव्हा डॉ. गाडगीळ रागावून सभेतून निघाले व घराकडे चालू लागले. निम्म्या रस्त्यावर गेल्यावर त्यांचे मत बदलले व परत येऊन त्यांनी आमचे म्हणणे मान्य केले.' संस्था म्हटली की, अशा झटापटी होतच असतात. पुढे संस्थेत अनेक उलाढाली झाल्या, प्रकरण न्यायालयात गेले आणि प्रा. माथुरांनी राजीनामा दिल्यावर प्रा. दांडेकर संचालक झाले.

(२)

मी पुण्यातील प्राध्यापक संघटना (पुटा) हिचे काम ७५ सालापासून पाहात होतो. ८७ साली विद्यापीठ

अनुदान आयोगाने प्राध्यापकांसाठी एका वेतन-श्रेणीची शिफारस केली. ती वेतन-श्रेणी मान्य नसल्याने अ. भा. प्राध्यापक संघटनेने संप पुकारला. तो ३७ दिवस चालला! नंतर त्या वेतनश्रेणीत स्वीकार्य बदल करण्यात आले व तो देशव्यापी संप संपला. महाराष्ट्र सरकारने ती वेतनश्रेणी लागू करावी यासाठी ८८ सालच्या डिसेंबरात महाराष्ट्रात संप करण्याची वेळ आली. तो संप ५२ दिवस झाला. नंतर महाराष्ट्र सरकार व प्राध्यापक संघटना यांच्यात करार होऊन जानेवारी ८९ मध्ये संप संपला. या सर्व घडामोडींमुळे एक लढाऊ संघटना असा प्राध्यापक संघटनेचा गवगवा झाला.

या काळात गोखले संस्थेतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचा-यांमध्ये बराच असंतोष पसरला होता. संस्थेचे तेव्हाचे संचालक डॉ. चित्रे हे संस्थेतील नोकरांवर अन्याय करतात, त्यांना पदोन्नती देणे दूरच राहो, पण पदोन्नतीसाठी अर्जही करू देत नाहीत, अशा त्यांच्या तक्रारी होत्या. गोखले संस्था ही महाविद्यालयांप्रमाणे (तेव्हाच्या) पुणे विद्यापीठाशी संलग्न नसली, तरी ती विद्यापीठाने मान्यता दिलेली संशोधन-संस्था होती. त्यामुळे तेथील शिक्षकांनाही विद्यापीठाने केलेले वेतन, पदोन्नती, सेवा यांच्या बाबतीतील नियम लागूच होते. त्याबद्दल सल्ला-मसलतीसाठी ब्रह्मेबाई व संस्थेतील शिक्षक माझ्याकडे येऊ लागले.

१९८९ सालच्या जानेवारी महिन्याच्या अखेरीला गोखले संस्थेतील एक प्राध्यापक डॉ. दासगुप्ता हे निवृत्त झाले. दासगुप्ता हे पूर्णपणे कम्युनिस्ट विचारांचे होते व त्यांच्या अभ्यासाचा विषय पूर्व युरोपातील राष्ट्रांची अर्थव्यवस्था हा होता. निवृत्त होण्यापूर्वीच त्यांनी विद्यापीठ अनुदान मंडळाकडे एक संशोधन-प्रकल्प सादर केला होता आणि विद्यापीठ अनुदान मंडळाने त्यांना संशोधनवृत्ती मंजूर केली होती. दासगुप्तांची नोकरी गोखले संस्थेत झाली असल्याने त्यांची साहजिकच अपेक्षा होती की, आपणास ही संशोधनवृत्ती संस्थेच्या माध्यमातून मिळावी व संशोधनाला लागणा-या सोयी संस्थेने उपलब्ध करून द्याव्यात. परंतु, संस्थेचे संचालक डॉ. चित्रे यांनी हे करण्याचे तर नाकारलेच, पण दासगुप्तांना ग्रंथालय वापरू देण्यासही नकार दिला!

संस्थेतील कर्मचारी संघटना व त्या संघटनेच्या प्रमुख ब्रह्मेबाई पुणे विद्यापीठ शिक्षक संघा (पुटा)कडे आल्या व त्यांनी आम्हाला प्रश्न समजावून सांगितला. 'पुटा'ने कर्मचारी संघटनेला संलग्नता दिली व या प्रश्नाबद्दल दोन बाजूंनी प्रयत्न करावयाचे ठरवले. एक बाजू म्हणजे संस्थाचालकांविरुद्ध लढा सुरू करायचा व दुस-या बाजूने संस्थेच्या कामकाजात मूलभूत परिवर्तन करण्यासाठी शैक्षणिक चळवळ सुरू करायची.

लढा सुरू करण्याआधी आम्ही संस्थेला इशारावजा पत्र पाठवले आणि दहा फेब्रुवारीला संघटनेचे एक शिष्टमंडळ चित्र्यांना भेटायला गेले. या शिष्टमंडळात संस्थेच्या नोकरीत असलेल्या ब्रह्मेबाई व मुळेबाई होत्या. त्यांच्याशी बोलण्यास चित्र्यांनी नकार दिला. चित्र्यांनी 'पुटा'च्या प्रतिनिधींना इतके मात्र सांगितले की, संस्थेच्या अध्यक्षांनीच 'दासगुप्तांची सोय करू नका', असे पत्र पाठवले आहे. मात्र यानंतर काहीच दिवसांनी संस्थेने दासगुप्तांना ग्रंथालय वापरण्याची परवानगी दिली. शैक्षणिक चळवळीचा एक भाग म्हणून संस्थेच्या कारभाराची पुनर्रचना करण्यासाठी एक शिक्षणप्रेमी लोकांचे मंडळ स्थापावे, असा विचार आला. प्रा. प्रधान, डॉ. केसर, प्रा. बाळ गाडगीळ व डॉ. सत्यरंजन साठे अशा ठळक लोकांनी त्यात भाग घेण्याचे मान्य केले. या सर्व कार्यात ब्रह्मेबाई सतत भाग घेत होत्या.

वर लिहिल्याप्रमाणे ब्रह्मेबाईंच्या मातोश्री संस्थापकांच्या प्रतिनिधी म्हणून संस्थेच्या कार्यकारिणीवर होत्या. त्या फार आजारी असल्याने त्यांनी सदस्यत्त्वाचा राजीनामा दिला. खरे तर ब्रह्मेबाई याच संस्थापकांच्या प्रतिनिधींचे काम करण्याला सुयोग्य व्यक्ती होत्या. पण त्यांनी मला सांगितले की, प्रा. वि. म. दांडेकर (हे संस्थेतून निवृत्त झाले होते.) त्यांना म्हणाले की, 'तुम्ही संस्थेच्या नोकरीत असताना संस्थापक-प्रतिनिधी म्हणून कार्यकारिणीवर जाणे प्रशस्त होणार नाही.' म्हणून त्यांनी मलाच कार्यकारिणीवर पाठवण्याचे ठरवले.

इकडे दासगुप्तांचा प्रश्न खदखदतच होता. संस्थेतील शिक्षक व शिक्षकेतरांचेही प्रश्न होते. महाराष्ट्र सरकारने 'चौथ्या वेतन आयोगाने ठरवलेली वेतनश्रेणी महाराष्ट्रातील महाविद्यालयीन व विद्यापीठीय शिक्षकांना द्यायची' असे जाहीर करणारा ठराव मंजूर केला होता. त्याबद्दल संस्था

काहीच बोलत नव्हती. संस्थेत निरनिराळ्या श्रेणीतील शिक्षकांच्या ३५ जागा होत्या. त्यातील १४ जागा कित्येक वर्षे रिकाम्याच होत्या, जाहिरात देऊनही अर्ज असे नव्हते. याचे कारण असे सांगितले जात होते की, संस्थेच्या नोकरीवर निवृत्तीवेतन मिळण्याची तरतूद नसल्याने बाहेरच्या विद्यापीठातील लोक नोकरीस येण्यास तयार नव्हते; आणि संस्थेतील शिक्षकांना वरच्या जागेवर नेमण्याची सत्ताधारी गटातील लोकांची इच्छा नव्हती!

१२ जूनला संस्थापकदिनाचा समारंभ होता. त्यादिवशी संस्थेतील कर्मचारी व आम्ही पुटाचे कार्यकर्ते मिळून २५-३० जण समारंभाला गेलो व मुख्य पाहुण्यांचे भाषण संपल्यावर जोरदार घोषणाबाजी केली. वर्तमानपत्रातून त्याचा बभ्रा झाला. समारंभाला आलेल्या अनेकांनी 'छान केले', असे म्हणून संघटनेचे अभिनंदनही केले.

आता प्रा. दासगुप्ता निकरावर आले होते. संशोधनवृत्ती मिळूनही ते पैसे त्यांच्या हाती पडत नव्हते, कारण, गोखले संस्था त्या संशोधनवृत्तीचे माध्यम होण्याची जबाबदारी घ्यायला तयार नव्हती. त्याच काळात, माझी आठवण बरोबर असेल तर प्राध्यापक, प्रपाठक अशा वरच्या पदांची जाहिरात संस्थेने दिली होती व संस्थेतील कोणीही या जागांसाठी अर्ज करू नये अशी दक्षता घेतली होती. काही अर्ज बाहेरच्या लोकांकडून आलेही होते. या सगळ्याचा चित्र्यांना जाब विचारावा या उद्देशाने चित्र्यांच्या कचेरीत दीर्घ काळ धरणे धरावे, असा ठराव आम्ही केला. ३ ऑगस्ट १९८९ रोजी तो अंमलातही आणला! संध्याकाळी ५ पासून रात्री २ पर्यंत हे धरणे चालले होते. रात्री ११ वा. प्रा. बि. म. दांडेकर आले. ते म्हणाले, "अरे, तुम्ही हे काय चालवले आहे! चित्रे वहिनींचा मला घाब-या-घाब-या फोन आला, म्हणून मी आलो. दासगुप्तांचे काम मी ताबडतोब करून देतो; पण त्यांनी संस्थेविरुद्धच्या त्यांच्या वागण्याची माफी मागितली पाहिजे आणि पुनः असे करणार नसल्याची हमी दिली पाहिजे." ते पुढे त्यांच्या खवचट स्वरात म्हणाले की, "तुम्ही दासगुप्तांना मोठे अर्थशास्त्रज्ञ वगैरे समजू नका हो! तसे काही नाही." दासगुप्तांनी माफी मागण्याचा प्रस्ताव आम्ही धुडकावूनच लावला. "आत्ता बघा तुमचे तुम्हीच", असे सांगून प्रा. दांडेकर निघून गेले.

या धरण्याची बातमी वर्तमानपत्रापर्यंत पोचली. वार्ताहर व छायाचित्रकार आले, प्रा. चित्रे व त्यांच्या भोवती आम्ही बसून होतो. रात्री दोनच्या सुमाराला आमच्यातीलच काही जणांना प्रा. चित्र्यांविषयी काळजी वाटू लागली व त्यांचा धीर सुटणार अशी लक्षणे दिसून लागली. तेही सांगत होते की, 'दासगुप्ता व नोकरीसाठी होऊ घातलेल्या मुलाखती यांच्या बद्दलचा निर्णय माझ्या हातात नाही.' त्यामुळे आम्ही त्यांना या दोन्ही बाबींवरील आमचे म्हणणे लिहून दिले व तीनच्या सुमाराला तेथून बाहेर पडलो.

हा धरण्याचा कार्यक्रम झाला तेव्हाही मी संस्थेच्या कारभारी मंडळाचा सभासद होतो व नंतरही तीन वर्षे सभासद राहिलो. डॉ. चित्रे यांची स्वतःची काय धोरणे अगर योजना होत्या, ते मला कधी कळले नाही. प्रा. दांडेकर व प्रा. रथ यांच्या सल्ल्याने ते चालतात, असे बोलले जात होते. कारभारी मंडळाचे अध्यक्ष श्री. मिश्रा नावाचे वृद्ध गृहस्थ होते. ते शरीराने विकल झाले असून कमरेत काटकोनात वाकले होते. कोणताही मुद्दा त्यांच्या ध्यानात यायला बराच वेळ लागत असे. डॉ. काकडे हेही कारभारी मंडळावर होते. ते अतिशय हट्टी गृहस्थ होते. मी आणि प्रा. व्यंकटरामय्या (संस्थेतील शिक्षकवर्गाचे प्रतिनिधी) यांनी शिक्षकांच्या हिताचा कोणताही मुद्दा लावून धरला की, काकडे म्हणायचे, "वाद घालू नका; वाटले तर कोर्टात जा!"

कारभारी मंडळाच्या वर्षातून चार बैठका होत. बैठकीची विषयपत्रिका आली की, मी व ब्रह्मेबाई प्रत्येक विषयाचा तपशिलवार विचार करीत असू. संस्थेच्या शिक्षक व शिक्षकेतर सेवकांच्याही अनेक अडचणी, शंका व मागण्या असत. त्या सर्वांचा मेळ घालावा लागे. काकडे व मिश्रा यांच्या सारखे हटवादी लोक तिथे असल्याने हाती काही फारसे लागत नसेच. मात्र नवीन शिक्षक-भरतीसाठी होऊ घातलेल्या मुलाखती आम्ही थांबावू शकलो व संस्थेतील शिक्षकांना तो दिलासा वाटवा.

जरा व्यापक दृष्टीने त्या वेळेच्या गोखलेसंस्थेकडे पाहिले, तर मला असे वाटते की, तेव्हा संस्थेचे चैतन्य निलंबित झाल्यासारखे होते. बाहेरची स्थिती फारशी किंवा मुळीच अनुकूल नव्हती. नियोजनावर आधारलेला विकास ही कल्पना देशाने सोडून दिली होती. त्यामुळे सरकारी

प्रकल्पांशी संबंधित अभ्यासाची कामे संस्थेकडे येत नव्हती. त्या कामांपासून मिळणारे शुल्क ही तुरळक झाले होते. संस्थेतील शिक्षकांच्या काही पदांना नियोजन मंडळाकडून, काही पदांना विद्यापीठ अनुदान मंडळाकडून तर काहींना महाराष्ट्र सरकारकडून अनुदाने मिळत होती. त्यामुळे ही पदे काही काळापुरतीच असत. (त्यानंतर नवी मुदत बहुदा मिळत असेच.) साहजिकच या पदांवरील शिक्षकांना निवृत्तीवेतनाची सोय नव्हती. नवीन वेतनश्रेणीमुळे होणारी पगारवाढ मिळण्यासही उशीर लागे. या उताराला लागलेल्या परिस्थितीवर उपाय हाच होता की, शासनाबाहेरील प्रांतांपासून अर्थसहाय्य मिळवणे व संस्थेची गंगाजळी वाढवणे. पण त्या बाजूने कोणीच विचार करीत नव्हते. किंबहुना, असा काही प्रयत्न करणे म्हणजे संस्थेला बाजारी रूप देण्याचा विचार होय, अशी धास्तीच सर्वांना होती. ब्रह्मेबाईंना तर हा विचार अजिबात आवडला नसता.

९२ साली बाई निवृत्त झाल्या व कारभारी मंडळावर त्यांना जायला आडकाठी राहिली नाही. माझी तीन वर्षांची मुदत संपली होतीच. त्यामुळे बाई कारभारी मंडळावर गेल्या.

(३)

एकूण नव्वद सालापासून पुढची वर्षे बाई आणि त्यांच्या गटातली माणसे यांना फार क्लेशाची गेली. बाई स्वतः कम्युनिस्ट पक्षाच्या सभासद नव्हत्या; पण मार्क्सची विचारप्रणाली त्यांनी आत्मसात केली होती. 'सोव्हिएट युनियन' या राष्ट्रसंघाविषयी व तेथील राजवटीविषयी त्यांना आत्मीयता वाटत असे. पण गोर्बाचेव्ह हे सोव्हिएट कम्युनिस्ट पक्षाचे चिटणीस झाले आणि तेथील राजवटीची आर्थिक दिवाळखोरी लोकांच्या समोर आली. जी-७ या श्रीमंत राष्ट्रांच्या गटापुढे आर्थिक मदतीसाठी नाकदु-या काढण्याची पाळी गोर्बाचेव्ह यांच्यावर आली. सोव्हिएट राजवटीची पुनर्रचना केली पाहिजे, व तेथील विचारांच्या अभिसरणाला मोकळीक दिली पाहिजे असे गोर्बाचेव्ह जाहीर रीतीने म्हणून लागले. त्याविषयी चर्चा करताना ब्रह्मेबाई एकदा असेही म्हणाल्या की, 'गोर्बाचेव्ह हा पंचमस्तंभी माणूस आहे.' पुढे सोव्हिएट युनियनचे विघटन झाले पूर्व युरोपातील सोव्हिएट युनियनच्या आधिपत्या-खालची राष्ट्रे स्वतंत्र झाली. तेथील कम्युनिस्ट राजवटी झुगारून दिल्या गेल्या. पश्चिम व पूर्व जर्मनी यांचे एकीकरण झाले. त्यामुळे साम्यवादी विचारांची माणसे म्हणू लागली की, साम्यवादाचा रशियातील प्रयोग फसला कारण तेथील कम्युनिस्ट पक्ष साम्यवादाशी निष्ठा ठेवून राहिला नाही, पण चीनमध्ये अजून आशेला जागा आहे. ब्रह्मेबाईंना हा युक्तिवाद फारसा पटत नसे. तेवढ्यात चीनमध्ये तियान-आन-मेन या मैदानात धरणे धरून बसलेल्या विद्यार्थ्यांवर चिनी सत्ताधा-यांनी रणगाडे घातल्याची क्रूर घटना घडली. त्यानंतर चीननेही साम्यवाद, नियोजनातून विकास, नियंत्रित बाजारपेठ इत्यादी तत्त्वे बाजूस ठेवून भांडवलशाही मार्गाचा अवलंब केला.

पण पूर्व युरोप, रशिया, चीन या दूरच्या गोष्टी झाल्या. नरसिंहराव यांच्या नेतृत्वाखालील भारत सरकारनेही खुला आंतरराष्ट्रीय व्यापार, खुली बाजारपेठ, खाजगी उद्योगांना नियंत्रणातून मुक्त करणे वगैरे धोरणे झपाट्याने अंमलात आणली. तेव्हा ब्रह्मेबाई अगदी अस्वस्थ झाल्या. या विषयावर त्यांनी प्रश्नउत्तरे पुस्तिका काढल्या व खुल्या आंतरराष्ट्रीय व्यापाराने देश भिकेला लागेल, असे मत वारंवार ठासून मांडले. 'स्वदेशी मालच वापरला पाहिजे, परदेशी वस्तूंवर बहिष्कार टाकला पाहिजे' असा उपदेश बाई व त्यांच्या गोटातली विचारी माणसे करू लागली.

मी शिक्षक संघटनेचे काम पाहात होतोच. अखिल भारतीय प्राध्यापक संघटना आणि मुंबई विद्यापीठ प्राध्यापक संघटना यांच्यावर साम्यवादी कार्यकर्त्यांचा पगडा होता. पण पुण्यात तशी स्थिती नव्हती. बाई नेहमी मला म्हणत, "तुमची संघटना इतकी बळकट आहे. नव्वद दिवसांचा संप तुम्ही केलात. तुमची संघटना या 'खाऊजा' धोरणाच्या विरोधात आमच्या बरोबर का काम करीत नाही?" गोष्ट अशी होती की, नवीन वेतनश्रेणी मिळाल्यावर बहुतेक प्राध्यापक सुखावले होते. कित्येकजण शेअरबाजार, भूखंडाची खरेदी-विक्री अशा उद्योगातून पैसे कमावत होते. पुष्कळजण तर सरकारच्या नव्या धोरणाच्या बाजूनेच होते. त्यातून ८३ सालापासून खाजगी महाविद्यालये, अभिमत विद्यापीठे यांचा बुजबुजाट झाला होता आणि एकूण प्राध्यापकात अनुदानीत जागांवरील प्राध्यापकांची संख्या अगदीच कमी झाली होती. शिक्षक संघटनेलाही

कठिण दिवस आले होते. अशी निराशापूर्ण स्थिती असतानाही बाई त्यांच्या परीने 'खाऊजा' धोरणाविरुद्ध लढतच राहिल्या.

(४)

दोन हजार पाच साली गोखले संस्थेत एक निकराचा पेचप्रसंग निर्माण झाला. ८९-९२ काळात संस्थेत जी मंडळी होती त्यातली बहुतेक आता निवृत्त झाली होती. प्रा. चित्रे निवृत्त होऊन १० वर्षे झाली होती. भारत सेवक समाजातील मिश्रा, काकडे इ. वृद्ध मंडळी निवृत्त किंवा दिवंगत झाली होती. आता द्विवेदी नावाचे गृहस्थ समाजाचे अध्यक्ष होते. आजगावकर नावाचे 'समाजा' चे सदस्य कारभारी मंडळावर होते; पण काही आरोप झाल्याने त्यांनीही राजीनामा दिला होता. 'समाजा'पाशी कारभारी मंडळावर नेमायला स्थानिक माणूसच नव्हता, ब्रह्मेबाईंनी व संस्थेच्या शिक्षकांनी द्विवेदींकडे माझी जोरदार शिफारस केली; तेव्हा सप्टेंबर २००५ मध्ये द्विवेदींनी 'समाजा'कडून माझी तीन वर्षांसाठी कारभारी मंडळावर नेमणूक करविली.

'संस्थे'ला आता 'अभिमत विद्यापीठ' हा दर्जा 'विद्यापीठ अनुदान मंडळा'कडून (वि. अ. मं.) मिळाला होता. 'वि. अ. मं.'ने अभिमत विद्यापीठांची घटना कशी असावी याची 'मार्गदर्शक तत्त्वे' घालून दिली होती. या वेळी संस्थेचे संचालक सिन्हा नावाचे प्राध्यापक होते व उपसंचालकपदी रॉय नावाचे प्राध्यापक होते. सिन्हा हे बहुतेक काळ परदेशातच असत व रॉय हे 'कार्यकारी संचालक' होऊन कारभार पाहात. आताही (सप्टेंबर २००५) सिन्हांनी फ्रान्समधील कोणत्या तरी परिषदेत जाण्यासाठी रजा मागितली होती. (ती रजा अध्यक्षांनी मंजूर करण्यापूर्वीच रॉयकडे कारभार सोपवून सिन्हा निघून गेले! प्रा. सिन्हा किंवा प्रा. रॉय यांना मी कधी पाहिलेही नाही.)

'वि. अ. मं.'ने अभिमत विद्यापीठाच्या घटनेविषयी जी मार्गदर्शक तत्त्वे ठरवली होती त्यामधील मुख्य मुद्दा असा होता की, कारभारी मंडळ हे नामांकित अर्थशास्त्रज्ञांचे असावे आणि संस्थेचे अध्यक्षपदही ज्येष्ठ अर्थतज्ज्ञांकडे द्यावे. थोडक्यात म्हणजे 'समाजा'चे संस्थेतून पूर्ण उच्चाटण व्हावे आणि संस्थापक प्रतिनिधीलाही 'कारभारी मंडळा'त स्थान नसावे. 'समाजा'चा या पुनर्रचनेला विरोध असणे, साहजिकच होते. दुसऱ्या बाजूने अनेक उच्चपदस्थ अर्थशास्त्रज्ञांची या पुनर्रचनेतून निर्माण होणाऱ्या पदांकडे आशाळभूत दृष्टी लागून राहिली होती. सिन्हा-रॉय ही जोडगोळी आशेला लागलेल्या उच्चपदस्थांचा उपयोग करून घेऊन आपले हितसंबंध साधण्याच्या मागे आहेत, अशी बोलवा होती. या वेळी कारभारी मंडळाचे अध्यक्ष द्विवेदी व सिन्हा यांच्यात वादावादी सुरू होती. संस्थेत काही नेमणुका व्हावयाच्या होत्या, त्यासाठीच्या मुलाखतींसाठी तज्ज्ञ-मंडळ नेमावयाचे होते. हे तज्ज्ञ कोण असावेत, हा वादाचा मुद्दा होता.

या वेळी कारभारी मंडळावर 'वि. अ. मं'चा प्रतिनिधी म्हणून प्रा. सुरेश तेंडुलकर होते. 'वि. अ. म'च्याच एका परिपत्रकाचा उपयोग करून संस्थेतील काही लोकांनी 'वि. अ. मं'कडे त्यांच्या कारभारी मंडळावरील नेमणुकीवर आक्षेप घेतला. 'वि. अ. मं'नेही प्रा. तेंडुलकर यांची नेमणुक रद्द करून मुंबई विद्यापीठातील प्रा. अभय पेठे यांना कारभारी मंडळावर नेमले. विरुद्ध बाजूने प्रा. सिन्हा यांनी ब्रह्मेबाईंना संस्थापक प्रतिनिधी म्हणून कारभारी मंडळावर नेमण्याचा काळे-विश्वास्त-निधीने जो ठराव केला होता त्याला हरकत घेऊन 'माझे समाधान होईपर्यंत मी तुम्हाला कारभारी मंडळाचा सभासद म्हणून स्वीकारणार नाही', अशी भूमिका घेतली. 'समाजा'ने माझी नेमणूक कारभारी-मंडळावर केली होती. त्यालाही सिन्हा-रॉय यांचा विरोधच होता. कारभारी मंडळाची बैठक बोलावण्याचे काम कारभारी मंडळाचा चिटणीस या नात्याने संस्थेच्या संचालकाचे असे.

सिन्हा फ्रान्सला गेले. रॉय, द्विवेदींची मान्यता नसतानाही, कार्यकारी संचालक म्हणून काम पाहू लागले. निवड-समितीचे गठन करण्यावरून द्विवेदी व रॉय यांचे भांडण चालून राहिले. अशा स्थितीत चिडून जाऊन द्विवेदी यांनी संस्थेत सूचना लावली की, (संस्थेतील ज्येष्ठ प्राध्यापक) महारत्ना यांची संस्थेचे कार्यकारी संचालक म्हणून नेमणूक केली आहे.' त्यावर रॉय यांनी दुसरी सूचना लावली की, 'मीच कार्यकारी संचालक आहे 'समाजा'ला संस्थेत ढवळाढवळ करायला अधिकार

नाही.' नंतर 'समाजा'ने ग्रंथालयाच्या एका भागाला स्वतःचे कुलूप लावले. रॉय यांनी ते काढून टाकले. अशा रीतीने 'समाज' व रॉय यांच्यातील भांडण चिघळत गेले.

ब्रह्मेबाईंना या सगळ्या घडामोडींमुळे साहजिकच चिंता वाटू लागली. त्या व मी असे माझ्या ओळखीच्या नामांकित वकिलाकडे गेलो. ते म्हणाले की, 'रॉय कारभारी मंडळाची सभा बोलावीत नसतील, तर अध्यक्ष द्विवेदी यांनी सभा बोलवावी. असे करण्याचा त्यांना पूर्ण अधिकार आहे. कारभारी मंडळाने ठराव करून रॉय व कुलसचिव श्रॉफ यांना कामावरून काढून टाकावे.' बाईंना आता अशी काळजी वाटू लागली की, द्विवेदींनी कारभारी-मंडळाची बैठक बोलावली तरी पाहिजे. तसे निर्णय होतीलच यांची खात्री नाही. कारभारी-मंडळाच्या सभासदांची रॉय-विरोधी आणि रॉयचे-पाठराखे अशी वाटणी करून त्या पुनः पुनः, मोजणी करू लागल्या.

द्विवेदींनी १७ नोव्हेंबर २००५ रोजी बैठक बोलावली. रॉय यांनी बाईंना पत्र पाठवले की, ही बैठक बेकायदेशीर असून द्विवेदींनी मंडळावर नव्याने केलेल्या नेमणुका बेकायदेशीरच आहेत. रॉयनी अभय पेठ्यांना फोन करून कळवले की, तुमची नेमणूक मार्च २००६ पासून करता येईल. आता तुम्ही सभासद नाहीत.' द्विवेदींनी बोलावलेल्या सभेला उत्तर म्हणून रॉयनी स्वतः ९ डिसेंबरला कारभारी मंडळाची सभा बोलावली.

१७ नोव्हेंबरच्या सभेला आम्ही ९ जण हजर होतो. महारत्नांनी सचिव म्हणून काम पाहिले अभय पेठे व उच्च शिक्षण संचालक कुलकर्णी हेही आले होते. सभेने दोन ठराव केले. एका ठरावाने त्या दोघांना त्यांच्या पदांवरून (पण नोकरीतून नव्हे) दूर केले. नंतर द्विवेदी व समाजाचे सचिव देशमुख यांनी संस्थेच्या बँकांना पत्रे लिहून रॉय-श्रॉफ यांच्या सहीचे धनादेश वटवू नयेत अशी विनंती करणारी पत्रे लिहिली. ते स्वतः बँकांच्या अधिका-यांना भेटूनही आले. हे सर्व झाले तरी बाईंची काळजी काही संपत नव्हती. त्यांना भीती वाटत होती की, रॉय बँकातील ठेवी मोडतील व रोजच्या व्यवहाराचे पैसे उभे करतील.

तीस नोव्हेंबरला रॉय यांनी संचालकांची कचेरी सोडली व ते स्वतःच्या खोलीत गेले. बाईंनी महारत्नांची मनधरणी केली की, त्यांनी संचालक होऊन, रॉयनी संचालकत्व अधिकृतपणे सोडले नसले तरी, कामाला सुरुवात करावी. आता संस्थेची नवी घटना कशी असावी याचाही विचार बाई नेटाने करू लागल्या.

दरम्यान रॉय यांनी संस्थेच्या नावाने उच्च न्यायालयात अर्ज केला की, द्विवेदींनी १७ नोव्हेंबरला बोलावलेली सभा बेकायदेशीर होती व तिचे निर्णय संस्थेवर बंधनकारक नाहीत! पण ६ डिसेंबरला रॉय यांचा अर्ज उच्च-न्यायालयाने फेटाळला व अशा रीतीने सिन्हा-रॉय यांचे बंड शांत झाले.

नंतर कारभारी मंडळाने सिन्हा व रॉय दोघांवरही आरोप-पत्र ठेवून त्यांना निलंबित केले. त्यांची चौकशी करण्यासाठी चौकशी समित्या नेमल्या. पण चौकशी समित्यांनी काम करण्याची वेळ आली नाही; कारण सिन्हा व रॉय यांनी संस्थेतील नोक-याच सोडून दिल्या. काही काळानंतर संस्थेने सध्याचे कार्यकारी संचालक राजस परचुरे यांची नेमणूक केली.

आता संस्थेची नवीन घटना झाली आहे. भारत सेवक समाजाने कारभारी-मंडळावरील आपला अधिकार सोडला आहे. संस्थापकांचा प्रतिनिधीही कारभारी मंडळावर नाही. विद्यापीठ अनुदान मंडळाच्या मार्गदर्शक तत्त्वांना अनुसरून संस्थेची घटना आता झाली आहे.

(५)

ब्रह्मेबाई वारल्या त्याला आता तीन महिने झाले. बाईंना श्रद्धांजली वाहणारे बरेच लेख वृत्तपत्रांतून आले. सर्वच लेखांत बाईंनी पुरोगामी चळवळीला दिलेल्या योगदानाचा उल्लेख होता. बाईंनी 'शंकर ब्रह्मे वाचनालय' काढले, 'लोकायत' ही संस्था उभी केली, अनेक आंदोलनात मोठ्या जबाबदारीने कामे केली, हे खरेच आहे.

पण 'गोखले संस्थे'ची काळजी वाहणे हे बाईंनी त्यांच्या प्रौढ वयात एक कुलव्रत म्हणून स्वीकारले होते. बाईंच्या आठवणी जागवतांना त्या संस्थेच्या भल्यासाठी किती धडपडल्या, किती खस्ता त्यांनी खाल्ल्या यांचा उल्लेख झाला नाही तर ती मोठी उणीव राहून जाईल, म्हणून हा लेख लिहिला. बाई संस्थेची जी काळजी घेत त्याला मी 'कुलव्रत' म्हटले आहे. ते बाईंना आवडले

नसते. कुल, जात, धर्म यांच्या मर्यादा त्यांनी मनातून काढून टाकल्या होत्या. पूर्वी त्या फोनवर स्वतःची ओळख "मी सुलभा ब्रह्मे बोलते आहे" अशी करून देत. गेली काही वर्षे त्या 'मी सुलभा बोलते आहे' अशी सुरुवात करीत. अगदी अलीकडे त्यांनी मला सांगितले होते की, "मी स्वतःला 'हिंदू' म्हणवून घेत नाही." महाराष्ट्रातील आधुनिकतेची सुरुवात केशवसुतांच्या 'ब्राह्मण नाही, हिंदुही नाही, न मी एक पंथाचा' या घोषणेतून झाली होती आणि ब्रह्मेबाई त्या आधुनिकतेची उपासना करणा-या होत्या. हे सारे मला माहीत असूनही ब्रह्मेबाईंच्या संस्थेविषयी वाटणा-या जिव्हाळ्याला 'कुलव्रत' म्हणणेच वाजवी ठरेल, असे मला वाटते. ❁❁❁

# नाथांचे नाट्यात्म रूपक : 'दादला'

सुधीर रसाळ

दादला

मोडकेंसें घर तुटकेसें छप्पर।
देवाला देवघर नाहीं।।१।।
मला दादला नलगे बाई ।।ध्रु.।।
फाटकेंच लुगडें तुटकीसी चोळी।
शिवाया दोरा नाही।।२।।
जोंधळ्याची भाकर आंबाड्याची भाजी।
वर तेलाची धार नाही।।३।।
मोडका पलंग तुटकी नवार।
नरम बिछाना नाही ।।४।।
सुरतीचे मोतीं गुळधाव सोने।
राज्यांत लेणें नाहीं।
एकाजनार्दनीं समरस झालें।
तो रस येथें नाहीं।।५।।

(क्र. ३७४२, एकनाथ गाथा, चित्रशाळा प्रकाशन, पुणे, पुनर्मुद्रण १९५६)

एकनाथांची रूपके 'भारुडे' म्हणून ओळखली जातात. ही रूपके जेव्हा नाट्यरूपात सादर केली जातात तेव्हा त्यांच्या सादरीकरणाला 'भारूड' म्हटले जाते. नाथांच्या गाथेत मात्र त्यांची नोंद 'रूपके' म्हणूनच केली गेली आहे. या रूपकांमध्ये दोन प्रकारच्या रचना आढळतात. यांतील काही रचना सांग रूपकात्म तर काही निरंग रूपकात्मक स्वरूपाच्या आहेत. सांग रूपकात्मक रचनेत एखाद्या लौकिक घटनेचे किंवा वस्तूचे एकेक अंग अध्यात्मातल्या एकेका संकल्पनेशी जोडलेले असते. लौकिक घटनेच्या सर्व अंगांच्या अनुक्रमिक जुळणीतून ती घटना सलगपणे साकार होते. या घटनेच्या एकेका अंगाला आध्यात्मिक संकल्पना जोडली जात असल्यामुळे या सर्व संकल्पना मिळून एक आध्यात्मिक विचार साकार केला जातो. म्हणून सांग रूपकात्म रचना एकाच वेळी लौकिकतेचा आणि आध्यात्मिकतेचा प्रत्यय देते. (उदाहरणादाखल नाथांचे 'विंचू' क्र. ३७९० हे रूपक पहावे.)

जेव्हा ही रचना निरंग स्वरूपाचे रूपक असते तेव्हा प्रेक्षक-श्रोत्यांसमोर किंवा वाचकाच्या मनात लौकिक पातळीवरची एक नाट्यपूर्ण घटना सलगपणे साकार केली जाते. या घटनेतील एखादे अंग हे सुप्त पातळीवरचे रूपक असते. या रचनेत शेवटची ओळ अशा प्रकारची असते की या नाट्यपूर्ण घटनेला आध्यात्मिक सिद्धान्ताचा अर्थ प्राप्त व्हावा. शेवटची ओळ म्हटली अगर वाचली जाईपर्यंत श्रोता-वाचक ही रूपकात्मक कविता वाच्यार्थानेच घेतो. लौकिक पातळीवरच्या घटनेतले सुप्त रूपक शेवटच्या ओळीमुळे स्पष्ट होते. शेवटची ओळ आणि लौकिक घटनेतील मुळात सुप्त असलेले पण या शवेटच्या ओळीमुळे प्रकट झालेले रूपक, यांमुळे कथिलेल्या लौकिक घटनेत रूपकप्रक्रिया घडून आध्यात्मिक अर्थ स्पष्ट होतो.

येथे चर्चेसाठी घेतलेले रूपक निरंग स्वरूपाचे आहे. या रूपकात दरिद्री नव-याच्या संसाराला कंटाळलेल्या आणि तो संसार व नवरा नकोसा झालेल्या स्त्रीचे मनोगत सलगपणे रेखाटले गेले आहे. ती आपल्या संसारातील एकेका गोष्टीबद्दल नाराजीच्या स्वरात बोलते. तिच्या या बोलण्यातून तिच्या दरिद्री संसाराचे एक चित्र उभे राहते. 'एकाजनार्दनीं समरस झालें। तो रस येथें नाहीं।।' ही शवेटची ओळ येताच हे संसाराचे चित्र आध्यात्मिक विचार प्रकट करणारे रूपक बनून जाते. या तुटक्याफाटक्या संसाराबद्दल नाराजीने बोलून तो स्पष्ट शब्दात नाकारणारी विवाहिता ही आध्यात्मिक साधना करणारी व्यक्ती बनते. ही व्यक्ती मुक्तीसाठी साधना करणारा पुरुष आहे. (सामान्यपणे अशी साधना स्त्रीवर्गात अल्प प्रमाणात होती.) आता या व्यक्तीला लौकिक संसार निरर्थक वाटू लागला असून तिला मुक्तीची ओढ लागली आहे. म्हणून ती 'एका जनार्दना'शी समरस झाली असून तिला या समरसतेत जाणवलेला 'रस' संसारात नाही याचा प्रत्यय आला आहे. या शेवटच्या

अनुक्रमणिका








ओळीतून एकनाथ स्वतःचे आध्यात्मिक मोठेपण प्रकट करीत नाहीत. येथे 'एकाजनार्दन' हे 'मोक्षाचा मार्ग दाखवणा-या गुरू'ची प्रतिमा म्हणून आलेले आहेत. शवेटच्या ओळीतील या उल्लेखातून नाथांनी दोन गोष्टी साधल्या आहेत. एक म्हणाजे या रूपकात्मक रचनेवर त्यांनी आपली नाममुद्र उठवली आहे. दुसरे म्हणजे मुक्तिमार्गावरचा साधकाचा प्रवास गुरूच्या मार्गदर्शना-शिवाय यशस्वी होऊ शकत नाही, त्यासाठी प्रथम संसारत्याग करून गरूशी 'समरस' झाले पाहिजे; हा संदेशही श्रोता-प्रेक्षक-वाचक यांच्यापर्यंत पोचवला आहे. बहुतेक रूपकांतील शेवटच्या ओळीत 'एकाजनार्दना'चा उल्लेख केला जाऊन त्याच्या पायी 'शरण' आल्याचे, त्याचे 'स्मरण' करीत असल्याचे किंवा एकाजनार्दनाच्या पायी नमन केल्याचे म्हटले जाते. शेवटच्या ओळीत येणारा हा उल्लेख सांग रूपकात्म आणि निरंग रूपकात्म रचनांतील लौकिक पातळीवरच्या नाट्यात्म अनुभवाला आध्यात्मिक अर्थ प्राप्त करून देणारा असतो.

या रूपकात्म रचनेतील लौकिक पातळीवरचे अनुभव (घटना, दृश्य किंवा व्यक्तीचे मनोगत यांतून प्रकट होणारे) सामान्य माणसाच्या जीवनात येणारे दुःखदायक स्वरूपाचे असतात. असेच अनुभव या रूपकात्म कवितेची सामग्री असते. लौकिक जीवनाची दुःखदायकता आणि निरर्थकता जाणवून दिल्याशिवाय माणूस अध्यात्माकडे वळणार नाही, म्हणून असेच अनुभव नाथांच्या रूपकात्मक कवितेतून साकार केले जातात. उदाहरणार्थ नाथांनी एका रूपकात संसारनगरीत भरलेल्या बाजाराचे वर्णन केले आहे. कामक्रोधलोभादी वस्तूंचा हा बाजार आहे. अशा वस्तूंचा उपभोग हा माणसाला सुखकारक वाटत असला तरी त्यांच्या उपभोगामध्ये अंतिमतः दुःखच असते, असे या रूपकात नाथ सांगत आहेत. या खोट्या सुखप्राप्तीसाठी 'या हाटाशी थोर थोर मेले' परंतु 'नारद, शुक, भीष्म' यांना मात्र हे खोटेपण 'उमगले', हे सांगून नाथ म्हणतात, 'एकाजनार्दनीं बाजार लटिका। संतसंगावाचुनी नोहे सुटका।।' (क्र. ३७९६) आपण चर्चेसाठी घेतलेल्या रूपकातही असाच सामान्य स्त्रीच्या जीवनातील असमाधानकारक, दुःखदायक अनुभव रूपक म्हणून चित्रित झाला आहे.

या रूपककवितेचे शीर्षक असलेल्या आणि ध्रुवपदात येणा-या 'दादला' या शब्दाचा आपण प्रथम विचार करू. येथे 'दादला' हा शब्द केवळ 'नवरा' या अर्थी येत नाही तर तो एक प्रतिमा म्हणूनही येतो. येथे अर्थातच या शब्दाचे प्रतिमारूप महत्त्वाचे आहे. लौकिक जीवनात किंवा संसारात माणसाला जे जे हवे असते ते ते पुरवणा-या सर्व आर्थिक-सामाजिक संस्थांसाठी 'दादला' ही प्रतिमा नाथांनी योजली आहे. संसारात पत्नीच्या गरजा पुरवणे आणि तिच्या सुखाची काळजी वाहणे, हे नव-याचे कर्तव्य असते. नव-याने आपल्यासाठी हे करावे, अशी पत्नीचीही अपेक्षा असते. परंतु हा 'दादला' त्याच्या 'पत्नी'च्या अपेक्षेइतके तिला पूरवू शकत नाही. 'दादल्या'बद्दल तक्रार करणारी पत्नी ही सामान्य माणसाची प्रतिमा आहे. परंतु माणसाच्या गरजा कधीच न संपणा-या असल्यामुळे त्या सतत पुरवत राहण्याची ताकद या संसारातील आर्थिक-सामाजिक संस्थांमध्ये नसते. त्यामुळे जर त्या हव्या तेव्हा, हव्या त्या प्रमाणात आणि अपेक्षित स्वरूपात पुरवल्या गेल्या नाहीत तर व्यक्ती असमाधानी, दुःखी बनते. हे दुःख जर टाळायचे असेल तर व्यक्तीने आपल्या गरजा आणि अपेक्षा मर्यादितच ठेवल्या पाहिजेत आणि शेवटी वैराग्य अंगी बाणवून या गरजा तोडल्या पाहिजेत, अशी आध्यात्मिक भूमिका नाथांनी मांडलेली आहे.

ज्यांना आपण माणसाच्या मूलभूत, प्राथमिक गरजा म्हणतो त्यांचाच म्हणजे अन्न, वस्त्र, निवारा यांचा, उल्लेख नाथांनी या कवितेत केला आहे. या प्राथमिक गरजा अधिकाधिक चांगल्या प्रकारे पुरवल्या जाव्यात, असे माणसाला वाटत असते. निवा-यासाठी त्याला झोपडीऐवजी बंगला असावा असे वाटते. बंगलावाल्यांना बंगल्याऐवजी राजवाडा हवा असतो. भुकेसाठी त्याला भाकरीऐवजी मिष्टान्नाची हाव असते. माणसाचा हा लोभ कधीच थांबत नसतो, असे नाथांना वाटते. म्हणून या रूपकात नाथांनी या मूलभूत गरजांचे किमान रूप व्यक्त केले असून या किमान रूपाबद्दल या विवाहितेला तक्रार करायला लावली आहे. या विवाहितेला तिच्या दादल्याने 'मोडकेसे घर' (निवारा), 'फाटकेसे लुगडे' (वस्त्र) आणि जोंधळयाची भाकर व 'वर तेलाची धार' नसलेली 'आंबाड्याची भाजी' (अन्न) प्राप्त करून दिलेली आहे. जगायला आवश्यक

असणा-या प्राथमिक गरजा त्यांच्या किमान रूपातही धडपणे 'दादल्या'कडून पुरवल्या जात नसतील तर असा 'दादला' हवाच कशाला? असा प्रश्न ही 'विवाहिता' विचारते आहे.

या गरजांसोबत माणसाला वंश टिकवण्यासाठी शारीरिक सुखही आवश्यक असते. तेही या संसारात नीटपणे मिळत नाही. या सुखासाठी धडधाकट पलंग हवा आहे, त्यावर मऊ, सुखदायक बिछानाही आवश्यक आहे. परंतु दादल्याकडून हेही धड स्वरूपात मिळालेले नाही. मोडका पलंग, तुटकी नवार आणि मऊ नसलेला बिछाना ही तिच्या शृंगाराची सामग्री आहे. अशा बिछान्यावर शृंगार सोडाच, धड झोपही मिळू शकत नाही, हे या उल्लेखांतून ती सुचवत आहे. गरजा भागवण्यासाठी निकृष्ठ प्रतीची सामग्री मिळालेली असल्यामुळे ही विवाहिता असमाधानी आहे. अन्न, वस्त्र, निवारा आणि लैंगिक सुख या आवश्यक गरजांबरोबरच माणसाला सुंदर राहणेही गरजेचे वाटते. म्हणून स्त्रियांना दागिन्यांची हौस असते. परंतु 'सुरतेचे' मोती आणि उत्तम प्रतीच्या गुळाला असतो तशा पिवळ्याधमक रंगाचे सोने या विवाहितेच्या नशिबात नाही. थोडक्यात तिच्या वाट्याला आलेला संसार तिला सुखाचा वाटत नाही.

या रूपकात 'दादल्या'चा उल्लेख ध्रुवपदात आलेला असल्यामुळे आणि ते प्रत्येक कडव्याच्या शेवटी पुनरावृत्त होऊन प्रत्येक कडव्याला अर्थ मिळवून देत असल्यामुळे या रूपक कवितेतील ती सूत्रप्रतिमा आहे. अन्न, वस्त्र निवारा आणि शरीरसुख पुरविणा-या आर्थिक-सामाजिक व्यवस्थांमध्ये व्यक्तीच्या गरजा त्याला हव्या तशा पुरवण्याची ताकद नसते. व्यक्तीच्या गरजा तर वाढतच जातात. अशा परिस्थितीत जर त्या त्याला हव्या तशा भागवल्या गेल्या नाहीत तर व्यक्ती असमाधानी, दुःखी होते. म्हणून या गरजांच्या वाटा जशा रोखल्या पाहिजेत तसेच त्या भागवणा-या आर्थिक-सामाजिक संस्थांशी संबंधही तोडले पाहिजेत. आपल्या गरजा भागवण्यासाठी या विवाहितेला हव्या तशा प्रतीच्या वस्तू तिच्या दादल्याकडून प्राप्त होत नाहीत म्हणून ती हा 'दादला' नाकारते आहे, या प्रतिमात्म घटनेतून नाथांनी हे तत्त्व प्रस्थापित केले आहे.

ही कविता वाचताना (अगर तिचे सादरीकरण पहाताना) तिच्यातील मोडक्यातोडक्या संसाराचे चित्र आपण वाच्यार्थाने स्वीकारीत जातो. दरिद्री संसाराला विटलेली ही विवाहिता त्राग्याने तिच्या संसाराला दूषणे देत आहे आणि असा संसारही नको आणि तो देणारा दादलाही नको, असे म्हणत आहे; अशा अर्थाने ही कविता आपण स्वीकारीत जातो. परंतु ही विवाहिता जेव्हा दादला नाकारून 'एकाजनार्दनीं समरस झालें। तो रस येथे नाही।।' असे म्हणते तेव्हा आपण जर ही कविता वाच्यार्थाच्या पातळीवर स्वीकारीत असू तर या पातळीवर या विवाहितेला व्यभिचारिणीचे रूप मिळते. परंतु आपणांस 'एकाजनार्दन' हे संत आणि सद्‌गुरू असल्याचे माहीत असल्यामुळे त्यांच्याशी समरस होणे म्हणजे काय, हेही आपणांस माहीत असते. म्हणून आपण हा वाच्यार्थ न स्वीकारता रूपकार्थाकडे जातो. अशा प्रकारे आपली दृष्टी बदलताच आपणांस ही कविता एक रूपक म्हणून ज्ञात होऊ लागते. आपण जेव्हा दरिद्री संसाराचे हे दृश्य रूपक म्हणून स्वीकारू लागतो तेव्हा या संसारात 'देवाला देवघर नाही' नाथांनी पहिल्याच कडव्यात केलेल्या ह्या उल्लेखाची अर्थपूर्णता लक्षात येऊ लागते. वाच्यार्थाच्या पातळीवर या संपूर्ण वर्णनात ही ओळ सुसंगतपणे बसतच नाही. याचे कारण या विवाहितेला फक्त उपभोगाच्या उत्तम वस्तू हव्या आहेत. अशा उपभोग्य वस्तूंत 'देवघर' बसत नाही. तिला हा दरिद्री, म्हणून दुःखदायक संसार नको आहे, कारण या संसारात देवाला कसलीही प्रतिष्ठा नाही, असेही तिला म्हणायचे आहे. हे लक्षात येताच यातले रूपक स्पष्ट व्हायला लागते. दरिद्री संसारात 'देवाला देवघर' घेणे सांसारिकाला परवडत नाही, हे जसे येथे सूचित केले जाते तसेच या, म्हणजे केवळ दरिद्रीच नव्हे तर कुठल्याही पातळीवरच्या संसारात, देवाला कसलेही स्थान नाही; काहीही किंमत नाही; देवाच्या प्रतिष्ठेला, मानवी जीवनात देवाला असलेल्या मूल्याला साजेसे या संसारात काहीही केले जात नाही; देवाला साधे देवघरही मिळत नाही; म्हणून हा संसारच नको; हेही येथे सूचित केले जाते. जेथे देवाला मूल्य आणि केंद्रस्थान आहे, किंबहुना जेथे देवसंलग्न मोक्षप्राप्ती हेच उद्दिष्ठ आहे अशा जीवनाचा स्वीकार माणसाने








केला पाहिजे, हे यातून सुचवले जात आहे.

या रूपककवितेच्या प्रत्येक कडव्यातील शेवटची ओळ आणि ध्रुवपद नकारात्मक आहे. प्रत्येक कडव्यातील शेवटची नकारात्मक ओळ आणि त्यानंतर लगेच येणारे नकारात्मक ध्रुवपद वाचक-श्रोत्याच्या मनात या संसाराबद्दल तीव्र नकार रुजवतात. त्यामुळे या कवितेची 'तो रस येथें नाहीं' ही शेवटची ओळ वाचकमनावर या संसारबद्दल प्रतिकूलतेची भावना पक्की करते. नाथांनी येथे कृतिप्रेरक शैली स्वीकारली आहे. ही शैली वक्तृत्वपूर्ण आणि नाट्यात्म स्वरूपाची असते. लेखक - कवीला वाचकाकडून - किंबहूना एकूण समाजाकडून - विशिष्ट कृतीची अपेक्षा असते. ती कृती करण्याची प्रेरणा वाचकात जागृत करणे हे कृतीप्रेरक शैलीचे उदिष्ट असते. नाथांनी आपल्या रूपकात्म रचनेत या शैलीचा अवलंब केला आहे.

या नकारात्मक ओळी वाचकमनावर आणखी एक परिणाम घडवतात. या संसारात नेहमी असेच असणार आहे; या संसाराचे तुटपुंजेपण कुठल्याही प्रयत्नातून बदलता येणार नाही. दुस-या कडव्याची 'शिवाया दोरा नाहीं' ही शेवटची ओळ या दृष्टीने अर्थपूर्ण आहे. फाटकेतुटके कपडे दो-याने शिवून ते तात्पुरते नीटनेटके केले जाऊ शकतात. परंतु हा संसार असा आहे की येथे फाटलेले, तुटलेले नीटनेटके करण्यासाठी कोणतेच साधन उपलब्ध नाही. एकदा 'कपडा' फाटला की तो कायमचा फाटका असणार. येथे आंबाड्याची भाजी तेलाच्या धारेशिवायच खावी लागणार, आरामासाठी नरम बिछाना कधीच नसणार. हे (दादल्याचे) राज्य असे की येथे सोन्यामोत्याचे 'लेणे' कधीच मिळणार नाही. येथे योजिलेली 'राज्य' ही प्रतिमा लक्षणीय आहे. 'नव-याच्या राज्यात बायकोने सुखं भोगून घेतली पाहिजेत; मुलाच्या राज्यात त्याची अपेक्षा करू नये' असे आपल्या कुटुंबव्यवस्थेत म्हटले जाते. नवरा हा त्याच्या संसारराज्यात सत्ताधीश 'राजा' असतो. आणि त्याची पत्नी त्याच्या राज्यात 'राणी' असते. राजाने कमवलेले वैभव ती भोगत असते. या रूपक कवितेतील नायिकेच्या दादल्याच्या 'राज्यात' सुरती मोत्ये आणि 'गुळधाव सोने' या वैभवदर्शक वस्तूंचा अभाव आहे. हा अभावही कधी दूर होण्याची शक्यता नाही. थोडक्यात, हा संसार सदैव मोडकातोडका, दरिद्रीच असणार; तो माणसाला कधीच सुखी बनवू शकणार नाही; म्हणून त्याच्यात 'रस' घेऊ नका; हा नाथांचा संदेश आहे.

ज्यांना ज्यांना दरिद्री संसार लाभला आहे, त्यांनी त्यांनीच फक्त तो नाकारून मुक्तिमार्गाचा अवलंब करावा. असे नाथांना सूचवायचे नाही. हा संसार क्षर आणि विनाशी स्वरूपाचा असून आज जरी या संसारातील गोष्टी नीटनेटक्या, सुखदायक वाटत असल्या तरी त्या कधी ना कधी जीर्ण, मोडक्यातोडक्या, निकामी आणि दुःखदायक होणारच. आज कदाचित विवाहीतेला लाभलेले घर नवे कोरे असेल, तिची लुगडे - चोळी धड असेल पण हे घर, ही लुगडे-चोळी कधीतरी मोडणार आणि फाटणार आहे. आज कदाचित या नव्या, सुंदर गोर्ष्टीचा उपभोग आनंददायक वाटत असेल पण जेव्हा जीर्णशीर्ण होतील तेव्हा त्या दुःखदायकच होतील. ज्या गोष्टी अशा जीर्ण होत जाणा-या आणि विनाश पावणा-या असतात, त्यांच्या आजच्या आकर्षक रूपापासून मिळणारे सुख ही असेच नष्ट होणारे आणि अंतिमतः दुःखदायकच असते. मोक्ष हा अनंत, अविनाशी स्वरूपाचा असून त्याच्या प्राप्तीचे सुखही - ज्याला ब्रह्मानंद म्हणतात - तोही असाच अविनाशी, चिरंतन स्वरूपाचा आहे. अशा अविनाशी, चिरंतन, अक्षय, आनंददायक जीवनाचे उद्दिष्ट माणसाने आपल्या समोर ठेवले पाहिजे. या आध्यात्मिक भूमिकेवर ही रूपक कविता उभी असून या भूमिकेचे कृतीप्रेरक संस्कार करण्यासाठी नाथांनी तिची निर्मिती केली आहे.

नाट्यात्म सादरीकरण करण्याच्या हेतूने नाथांनी ही रूपके लिहिली आहेत. नाट्य ही मूळात कृतीची रचना असते. या रचनेत किमान दोन घटकात होणा-या कृतींची आणि कृतीसलग्न भाषेची, देवाण-घेवाणीच्या स्वरूपाची मालिका असते. एक व्यक्ती विरुद्ध दुसरी व्यक्ती, एक व्यक्ती विरुद्ध तिच्या भोवतीची परिस्थिती, एक व्यक्ती विरुद्ध व्यक्तिसमूह, दोन परस्पर विरुद्ध व्यक्तिसमूह, एक व्यक्तिसमूह विरुद्ध परिस्थिती, यांच्यात कृतींची आणि कृतीसंलग्न भाषेची देवाण-घेवाण होते. (परिस्थिती भाषेत बोलू शकत नसली तरी परिस्थितीचा अर्थ माणूस

भाषामाध्यमात लावत असतो.) अनेकदा दोन घटकात परस्परसमांतर पण परस्परभिन्न स्वरूपाच्या कृतींची मालिकाही घडू शकते. व्यक्तीने प्रत्यक्षात केलेली इंद्रियगोचर कृती आणि या इंद्रियगोचर कृतीशी संलग्न असलेली मानसिक कृती या दोन्हींचा समावेश या कृतींच्या रचनेत असतो. नाट्यातली इंद्रियगोचर कृती तिच्याशी संलग्न असलेल्या मानसिक कृतींचे सूचन करीत असते. म्हणून नाट्यात जेव्हा इंद्रियगोचर कृती संघटित केल्या जातात तेव्हा त्या मागच्या कृतीही आपोआप संघटित होत जातात. मनात निर्मिण होणा-या प्रेरणा आणि त्यातून प्रत्यक्ष कृतीसाठी एका प्रेरणेची केलेली निवड किंवा कोणती कृती करायची आणि ती कशी करायची या संबंधी घेतलेला निर्णय, यांचाही समावेश मानसिक कृतींत होतो. नाट्य ही या दोन्ही प्रकारच्या कृतींची नुसतीच रचना नसते तर तिला यशस्वी किंवा अयशस्वी शेवट ही असतो. तेथे कोणाच्यातरी कृतींचा 'जय' किंवा 'पराजय' झालेला असतो. ज्या कृतीमालिकेचा शेवट अपरिहार्यपणे जयात किंवा पराजयात होतो अशा कृतींची रचना म्हणजे परिपूर्ण स्वरूपाचे नाट्य.

नाट्य जेव्हा भाषिक रूपात व्यक्त होते तेव्हा त्याची भाषा पुढील कार्य करते : विशिष्ट कृती निवडण्यामागच्या आणि ती करण्यामागच्या प्रेरणा किंवा कारणे स्पष्ट करणे, एक कृती नाकारताना आणि तीच्या ऐवजी दुसरी करताना निर्माण होणा-या भावस्थितीची अभिव्यक्ती करणे, कृती केल्यावर होणा-या तिच्या अनुकूल-प्रतिकूल पर्यवसानावर भाष्य करणे आणि त्यामुळे निर्माण होणा-या मनोवस्था व्यक्त करणे, कृतींच्या या रचनेत सहभागी असलेल्या अन्य व्यक्तींच्या कृतींबद्दल होणा-या अनुकूल अथवा प्रतिकूल प्रतिक्रियेमागील कारणे आणि त्यामुळे होणारी मनोवस्था व्यक्त करणे, अन्य व्यक्तीच्या नापसंत असलेल्या कृती ऐवजी पसंत असलेली कृती करण्यासाठी त्याला प्रवृत्त करणे, अन्य व्यक्तीच्या नापसंत असलेल्या कृतीमुळे निर्माण होणा-या आणि त्याने तिच्याऐवजी अन्य कृती करावी अशी अपेक्षा करताना निर्माण होणा-या भावस्थितीची अभिव्यक्ती करणे, दुस-या व्यक्तीने केलेल्या पसंत कृतीमुळे निर्माण होणारी भावस्थिती प्रकट करणे, दुस-याच्या अशा भावस्थितीबद्दल अनुकूल-प्रतिकूल प्रतिक्रया देणे, आपण आणि दुस-याने केलेल्या कृतीच्या होणा-या पर्यवसनामुळे निर्माण होणा-या भावस्थितीची अभिव्यक्ती करणे. नाट्याची भाषा ही कार्ये करत असल्यामुळे या भाषेत आज्ञार्थी आणि विध्यर्थी वाक्यरचना मोठ्याप्रमाणात आढळतात. ज्या नाट्यात एकापेक्षा अधिक व्यक्ती सहभागी असतात आणि जेव्हा त्यांच्यात कृतिसंलग्न भाषिक संवाद होतो तेव्हा त्यांच्या संवादात भाषा उपयुक्त कार्य करते (यासाठी पहा : 'हिंदुतुर्कसंवाद' हे रूपक क्र. ३९७०) नाट्याच्या भाषिक रूपात कथनही असू शकते. परंतु हे कथन कृतिसंलग्न, कृतिजनक घटनेचे असते. ते विशिष्ट कृतीच्या अपरिहार्यतेमागच्या घटनेचे कथन असते.

नाट्य ही कृतींची आणि कृतीसंलग्न भाषेची संघटना असल्यामुळे आणि नाट्यात आज्ञार्थी आणि विध्यर्थी भाषाप्रयोग होत असल्यामुळे कृतिप्रेरणेच्या उद्दिष्टाने निर्माण होणा-या साहित्यामध्ये नाटकांची संख्या अधिक असते. अनेक नाटकांत यासंबंधी संदेश दिले गेलेले आणि दिले जाताना दिसतात. नाट्यात हे सामर्थ असल्याने नाथांनीही समाजात आध्यात्मिक कृती रूजावी म्हणून नाट्यात्म रूपके लिहिली.

नाट्यविषयक उपर्युक्त संकल्पनेच्या आधारे प्रस्तुत रूपकाचा विचार करू. या रूपकात विवाहिता हे प्रमुख पात्र असून तिचा दादला आणि त्याने निर्माण केलेली परिस्थिती हे प्रतिपात्र आहे. या विवाहितेला तिच्या संसारात जे जे आणि ज्या ज्या रूपात हवे आहे ते तिच्या दादल्याने दिलेले नाही. म्हणून तिच्या जीवनातले 'दादला' म्हणून तिच्या दादल्याचे असलेले अस्तित्व जरी ती नाकारीत असली तरी आता तिला हाच नव्हे तर कोणताच दादला नको आहे. म्हणून ती 'मला हा दादला नलगे बाई' ऐवजी 'मला दादला नलगे बाई' असे म्हणत आहे. दादल्याबरोबरच त्याने तिला दिलेला हा संसारच केवळ नाकारीत नाही तर ती एकूण 'संसार' हा प्रकारच नाकारीत आहे. या नकाराबरोबरच तिने वेगळ्या कृतीचा निर्णयही घेतला असून तो तिने अमलातही आणला आहे. ती आता दादल्याऐवजी 'एकाजनार्दनी' समरस झाली आहे. तिला हवा असणारा 'रस'तिला दादल्याच्या संसारात

मिळाला नसता. आता तो 'रस' एकाजनार्दनीं समरस झाल्यामुळे तिला मिळाला आहे. हे नाट्य 'दादल्या'च्या 'पराजयात' आणि तिच्या 'विजयात' पर्यवसित झाले आहे. तिच्या 'दादल्याने' तिला जे दिले ते नाकारणारी आणि असमाधान व्यक्त करणारी भाषा येथे योजिली गेली आहे.

नाथांच्या रूपकांत सामान्यपणे एकच व्यक्ती श्रोत्यासमोर बोलत असते. (यासाठी पहा : 'जोहार' या शीर्षकाखालील रूपके क्र. ३८६२ ते ३८९९) बोलणारी व्यक्ती आपल्याभोवतीच्या परिस्थितीबद्दल आणि आपल्यासंबंधी घडलेल्या घटनांबद्दल आपल्या अनुकूल-प्रतिकूल भाववैचारिक प्रतिक्रिया देऊन तिच्यासंबंधी आपण कोणता निर्णय घेतला किंवा तिच्या संदर्भात आपण कोणती कृती करणार आहोत, हे स्पष्ट करीत असते. काही रूपकात बोलणारी व्यक्ती माणसाभोवतीची परिस्थिती कशी प्रतिकूल आहे, हे सांगून माणसाने अशा परिस्थितीत कोणती कृती करावी किंवा कोणता निर्णय घ्यावा याचा आदेश देत असते. माणसाभोवतीची लौकिकातली प्रतिकूल परिस्थिती आणि व्यक्तीने ती नाकरून आध्यात्मिक मार्ग स्वीकारण्यासंबंधीचा घ्यायचा निर्णय, अशी सामान्यपणे नाथांच्या रूपकांची रचना असते. आपण चर्चेसाठी घेतलेल्या रूपकाचीही रचना याच प्रकारची आहे. थोडक्यात, या रूपकातील विवाहित स्त्रीच्या भोवती तिने नाकारावी अशी परिस्थिती, तिचा या परिस्थितीला असलेला नकार आणि वेगळ्या परिस्थितीच्या स्वीकृतीचा निर्णय घेऊन त्याप्रमाणे केलेली कृती, अशा प्रकारची या रूपकाची रचना आहे.

नाथांच्या रूपकात जे अभिप्रेत आहे ते जाणून घेऊन त्या रूपकाचे सादरीकरण भारुडात केले जाते. या सादरीकरणाचा तोंडवळा वारकरी कीर्तनाचा असतो. कीर्तनकार कीर्तनात एखाद्या अभंगावर गंभीर स्वरूपाचे निरूपण करतो. ते करीत असताना तो उदाहरणादाखल इतर अभंग म्हणतो. कीर्तनात अभंगाच्या ध्रुवपदाच्या गायनाच्या वेळी टाळकरी त्या ध्रुवपदाचे सामूहिक गायन आणि रामकृष्णहारी या मंत्राचा उद्‌घोष करीत राहतात. कीर्तनातली निरूपणपद्धती भारुडामध्ये नट आणि त्याचा साथीदार यांच्यामध्ये विभागली जाते. हे रूपक ज्या भूमिकेचे सादरीकरण असते त्या भूमिकेची केवळ ओळख पटेल एवढीच वेषभूषा ती भूमिका सादर करणा-या नटाने केलेली असते. प्रतीकात्मक वेषभूषा केलेला नट, त्याचा एक साथीदार आणि मागे वादक आणि टाळकरी, एवढ्यांचीच या सादरीकरणाला गरज असते. प्रतीकात्मक वेषभूषा केलेला नट रूपकाचे गायन करू लागतो. गायक नटाचे गायन अधूनमधून मध्येच थांबवून रूपकात मांडल्या गेलेल्या लौकिक वास्तवावर, नट जी भूमिका सादर करतो त्या भूमिकेवर किंवा रूपकातील एखाद्या शब्दावर त्याचा साथीदार मनोरंजक, विनोदी परंतु चुकीचे, गैरलागू भाष्य करतो. हे त्याने जाणीवपूर्वक केलेले असते. यातून या रूपकाचा गैरलागू अर्थ नाकारून योग्य अर्थ घेण्याला प्रेक्षक-श्रोत्यांना भाग पाडले जाते. या भाष्यात अनेकदा वर्तमान परिस्थितीचे दाखले आणि संदर्भही येतात. त्याचे हे भाष्य प्रेक्षक-श्रोत्यांना हसवणारे असते. मग साथीदाराचे चुकीचे म्हणणे खोडून काढीत रूपकात नेमके काय म्हटले आहे, यावर गायक नट निरूपण करतो. संपूर्ण सादरीकरणात गायक नट आणि त्याचा साथीदार यांच्यात मनोरंजक संवाद घडत जातात. हे होत असतानाच त्या रूपकाचा योग्य संदेशही प्रेक्षक-श्रोत्यांपर्यंत पोचवला जातो. भारुडाच्या सादरीकरणात नट आणि त्याचा साथीदार यांच्यात होणा-या संवादांत उत्स्फूर्तता असते. रूपक जरी तेच असले तरी त्याचे सादरीकरण करणा-या नटांच्या उत्स्फूर्त आणि समयानुरूप संवादामुळे त्याला प्रत्येक वेळी नवे रूप मिळते.

नाथांच्या रूपकांमुळे वारकरी संप्रदायाचे आध्यात्मिक तत्त्वज्ञान जनसामान्यांत रुजले. प्रचलित श्रद्धा, धर्माच्या नावाखाली चाललेला अनैतिक आचार आणि निरर्थक बनलेल्या उपासनापद्धती यांवर नाथांनी रूपकांत टीका करून साध्यासोप्या भक्तिमार्गाचा पुरस्कार केला. त्या बरोबरच सामाजिक नीतीचे संस्कारही केले. समाजाचे आध्यात्मिक आचरण शुद्ध असावे, यासाठी या रूपकांतून संदेश देण्याचा त्यांचा प्रयत्न होता. या संदर्भात त्यांचे पुढील रूपक पहावे. 'शिळा तांब्याचें बाहुलें केलें। पाट मांडुनी वरी बसविलें। वस्त्र अलंकारीं गुंडाळिलें। मना आलें तें नाम ठेविलें।।१।। या जनासी लागलें वेड।।ध्रु.।। शुद्ध पाण्यानें प्रक्षाळिलें। गंध फुलानें झाकोळिलें। धूप

दाऊनि दीप उजळिलें। पुढें अन्न ठेवूनि चाळविलें।।२।। घेरे घेउनि भोवंडिलें। आडवे पडोनि दंडवत केलें। आपपर नाहीं देखिलें। एकाजनार्दनीं ओळखिलें।।३।।' (क्र. ३८३८) नाथांनी येथे मूर्तिपूजेची थट्टा केली आहे. मूर्तीची पूजा करण्याला 'वेड' म्हटले आहे. देवाच्या मूर्तीला ते उपहासाने 'शिळातांब्याचे बाहुलें' म्हणतात. या प्रतिमेतून मूर्तीला लहान मुलींच्या खेळण्याचे रूप दिले गेले आहे. मग पूजाविधी हा लहान मुलींचा बाहुला या खेळण्याबरोबर केलेला 'खेळ' होतो. बाहुल्याला स्वतःचे नाव नसते. मुली बाहुल्याबरोबर खेळताना आपल्या बाहुल्याला कुठले तरी नाव देतात. तसेच सर्व मूर्तीचे चेहरेही बाहुल्यांच्या चेह-याप्रमाणे एकसारखेच असतात. मग आपल्याजवळ असलेल्या 'बाहुल्या'ला कोणत्याही देवाचे नाव द्या, काही फरक पडत नाही. मग मूर्तिपूजक आपल्या बाहुल्याला आपल्या आवडत्या देवाचे नाव देतो. मुली आपला बाहुला लुटूपुटीच्या वस्त्रालंकारांनी सजवीत असतात. मूर्तिपूजकही आपल्या देवमूर्तीला असेच सजवतात. देवाची पूजा करणे म्हणजे देवमूर्तीला केवळ सजवणे. या सजवण्याचे एक उपहासगर्भ चित्र प्रस्तुत रूपकात नाथांनी सादर केले आहे. पूजाविधीतील कृतींसाठी योजिलेल्या क्रियापदांतून नाथांनी या विधीची हास्यास्पदता व्यक्त केली आहे. गुंडाळिलें, झाकोळिलें, चाळविलें, भोवंडिलें, दंडवत करण्यासाठी आडवे पडले, ही सर्व क्रियापदे पूजाविधीबद्दल नाथांचे प्रतिकूल मत नोंदवतात. पूजाविधीत परमात्मा आणि आत्मा यांत द्वैतभाव असतो. यात आपपरभाव असतो. म्हणून नाथ शेवटच्या ओळीत म्हणतात : 'आपपर नाहीं देखिलें। एकाजनार्दनीं ओळखिलें।' नाथांनी देव आणि भक्त यांत आपपरभाव पाहिला नाही. तो नसतो हे नाथांनी ओळखले आहे. दुसरे म्हणजे परमात्मा हा निर्गुण, निराकार आहे आणि तो नसतो हे नाथांनी ओळखले आहे. दुसरे म्हणजे परमात्मा हा निर्गुण, निराकार आहे आणि तो विश्वातील सर्व चराचरात आहे. मग जर तो फुलात, गंधात, नैवेद्यातही असेल तर देवाला हे अर्पण करणे म्हणजे देवाला 'देव'च अर्पण करणे होय; हा संदेशही त्यांना द्यायचा आहे. त्यांनी पूजाविधीची निरर्थकता जरी स्पष्टपणे सांगितली असली तरी हा विधी सातत्याने आजही टिकून आहे.

नाथांची रूपके पद्यात मांडलेली नाट्यसंहिता आहे. त्यांना काव्यमूल्य नसून केवळ नाट्यमूल्य आहे. त्यामुळे त्यांना काव्यात्म नाट्य म्हणता येणार नाही. ही संहिता पद्यमय असल्यामुळे तिचे गायन होऊ शकते. ही रूपके गायली जात असल्यामुळे ती लोकांच्या सहजपणे लक्षात राहतात. किंबहुना ती चटकन मुखोद्‌गतही होऊ शकतात. पद्यात ही क्षमता असल्यामुळे आणि पद्याच्या कर्त्याला पद्यरचनेत आपले नाव नोंदवता येत असल्यामुळे ही रूपके-म्हणजेच नाट्यसंहिता-पद्यात लिहिल्या गेल्या आहेत. नाथांच्या या रूपकांनी महाराष्ट्रात रंगभूमीचा पाया घातला, हे त्यांचे ऐतिहासिक महत्त्व आहे. ☯☯☯

# शेती, शेतकरी आणि शासन -

लेखांक - १२

वास्तविक शेती, शेतकरी, शासन हा विषय रूक्षच आहे. हिरवीगार शेती पाहिली की, तिथं जावं, तिथला मेवा खावा, शुद्ध वातावरण अनुभवावं असं आपल्यासारख्या शहरवासियांना वाटतं. पण त्या हिरव्यागार शेताला तसं सुंदर रूप आणण्यासाठी मळकट कपडे घालून शेतक-याला नांगरणी, कुळवणी, उखणी अशा कितीतरी गोष्टी कराव्या लागतात. रक्त आटवावे लागते. शासनाचा बडेजाव तर काय वर्णावा? त्यांचा तो महान तारणहार तलाठी! त्याचा तो पिवळा सातबा-याचा कागद. सहकारी सोसायटीचा शेतकरी आणि पीककर्ज नवं-जूनं करण्यासाठीची धडपड. क्वचित प्रसंगी जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेशी येणारा संबंध. हे सगळं शासनांकित प्रकरण म्हणजे शेतक-यासाठी केवळ झोंबी! सगळं कसं कोरडं आणि भावना शून्य. संवेदनाशील अधिका-यालादेखील या सगळ्याकडे पाहताना क्लेश होतातच. पण तेही जीवनच आहे. कदाचित पशू-पक्ष्यांच्या आणि वनचरांच्या जीवनापेक्षाही जास्त कष्टाच आहे.

हे सगळं अनुभवताना मला अनेकदा मनुष्याच्या मनाच्या शेतीचही दर्शन झालं. त्याबद्दल लिहिताना आपण विषयान्तर तर करीत नाही ना. अशी शंकाही वाटली. पण वाचक सूज्ञ आहेत, ते विषयान्तरही सांभाळून घेतील अशी श्रद्धा असल्याने थोड्या निराळ्या हकीकतीकडे वळतो.

(१)

बुलढाणा जिल्हा परिषदेचा मी मुख्य कार्यकारी अधिकारी (सी. ई. ओ.) होतो. खूपच मोठा बंगला होता. काही खोल्या बंद ठेवाव्या लागत होत्या. प्रवेशद्वारातून आत आल्यावर घरामध्येच एक छोटीशी कचेरी वजा खोली होती. अधिकारी किंवा कर्मचारी फाईल घेऊन आले तर तिथे बसत. बंगल्याच्या पाठीमागे थोड्या अंतरावर एक कुंटूब राहत होते. त्यांची रेखा नावाची मुलगी माझ्या बायकोला देवळात भेटत असे.

ओळखी मुळे ती मुलगी घरी येऊ लागली. शाळेतल्या मुलांचे गणवेश शिवण्याचा तिचा उद्योग होता. पाच-सहा शिवणयंत्रे तिच्याकडे होती व त्यावर ती हे काम करीत असे. आमच्या जिल्हा परिषदेच्या शाळांकरता गणवेश घ्यायचे होते आणि रेखाची इच्छा त्याचे टेंडर भरावे अशी होती. मला बायकोने सांगितले की, रेखा टेंडर भरणार आहे, तिकडे लक्ष ठेवा. खरेतर सरकारी कामात अधिका-याच्या बायकोने लक्ष घालायचे नसते. त्यामुळे तिने असे सांगावे त्याचे मला आश्चर्य वाटले. मी तात्पुरते "बघु" असे म्हटले.

बायकोने मला रेखाची माहिती सांगितली. शेजारच्या वाड्यातील एका मुलाबरोबर रेखाचे प्रेमसंबंध होते. रेखाच्या घरच्यांचा या संबंधाना तीव्र विरोध होता आणि त्याचे कारणही रास्त होते. दोघांच्या वयात पंधरा वर्षांचे अंतर होते. घरच्यांचा विरोध, धाकट्या भावाचाही विरोध अशी विचित्र स्थिती होती. तरीही आई-वडीलांना उत्पन्नाचे साधन असावे म्हणून रेखा हा शिवण्याचा धंदा करीत होती. रेखाविषयी सहानुभूती वाटल्याने आम्ही तिच्या आई-वडिलांना घरी बोलावून त्यांचे काय म्हणणे आहे, ते समजून घेण्याचे ठरवले.

एका रविवारी सकाळी ते दोघेही आमच्याकडे आले. त्या बोलण्यातून कळले की, त्यांचा विरोध खूपच आहे आणि त्यामुळे रेखाचे लग्न त्या मुलाशी करणे शक्य होईल असे दिसले नाही. मुलाकडे ही विरोध होताच. पण त्याला तोंड देण्याचे बळ त्याच्या अंगी होते. मुलाचे स्वतःचे घर होते. त्याचा भूखंड खरेदी-विक्रीचा धंदा होता. मुख्य म्हणजे मेहेकर या गावाकडे त्याची १० एकर शेती होती. मला मुलाची ही सर्व माहिती ऐकून बरे वाटले. चांगला उमदा दिसत होता.

त्या वेळेस मी बुलढाण्यातच एका आदर्श शेती उद्योगांचे काम करत होतो. त्याविषयी मागे एका लेखात लिहिलेच आहे. या कामात ह्या लग्नाळु मुलाचा उपयोग होईल असेही मला वाटले. म्हणून हे लग्न जुळवून आणावे अशी इच्छा मला झाली. एके दिवशी रेखा मला स्वतःहूनच भेटायला आली. ही टेंडरविषयी बोलायला आली की, आमचे तिच्या आई-वडिलांशी जे बोलणे

झाले त्याविषयी सांगायला आली. याचा मला अंदाज आला नाही.

मी म्हणालो, "टेंडरबद्दल बोलायला आलात का?"

"थोड तसचं; पण तुम्हाला वशिला वगैरे लावलेला आवडत नाही म्हणून मी त्या विषयी काही बोलत नाही. टेंडर तर भरते; त्याला तूमची हरकत नाही ना?"

"नाही. मग काय सांगायला आला होतात?"

"तस फारस काही नाही. जळगावच्या 'जैन इरिगेशन' मध्ये माझा भाऊ काम करतो. लहान आहे पण तापट आहे. तुम्हाला सगळं कसं सांगायचं याचा संकोच वाटतो. पण वहिनींनी सांगितलं की, 'काय असेल ते त्यांना सांगून टाक' म्हणून तुम्हाला सांगायला आले."

"काय खरं आहे ते सगळं मोकळेपणानं सांगा."

"माझ्या भावानं निरोप पाठवलाय की, हे लग्न करशील तर उभ चिरून टाकीन! आई-वडिलांचा विरोध आहेच. त्यांनी माझ्याशी बोलणही सोडलंय. तेव्हा आता मी काय करू?"

मला त्या मुलीच्या परिस्थितीचं गांभीर्य जाणवलं. तिच्या भावाच्या क्रोधाचही आश्चर्य वाटलं नाही. उलट कौतुकच वाटलं. त्याच बहिणीवर प्रेम होतं आणि त्याला बहिणीची काळजी होती. हे लग्न तिच्या सुखाच होणार नाही असं त्याला मनापासून वाटत होतं. आता हेही खर की, बहिणीनेही काहीतरी विचार केलाच असणार आणि आपलं सुख तिला कळत असणारच! त्यातून ती कमावती, सुशिक्षित, आई-वडिलांची काळजी घेणारी आणि सज्ञान! तिला आपल्या आयुष्याचा निर्णय करण्याचा पूर्ण अधिकार! मग हा का मध्ये येतोय?

"ठीक आहे. रागाच्या भरात तो बोलला असेल पण काळजी करू नका मी बघतो काय करायचं ते."

मी बायकोला सर्व सांगून टाकलं. विचार केला की, हे लग्न तर झालं पाहिजे. पण मार्ग असा पाहिजे लग्नात कोणतही विघ्न नको. एकदा सहज जिल्हा पोलीस अधिकारी (डी. एस. पी.) अतुलचंद्र कुलकर्णी भेटले. मी त्यांना सगळी परिस्थिती सांगितली.

"असं करूया का, की त्या मुलीकडून एक अर्ज घेऊया. गावातल्या पोलीस स्टेशनला तो देऊ. तुम्हालाही एक प्रत देऊ. अर्जात भावानं दिलेल्या धमकीचा सविस्तर उल्लेख करू. तो अर्ज रितसर दाखल झाल्याची पावती त्या मुलीला घ्यायला सांगतो." — मी.

मी हे सगळं बोलल्यावर डी. एस. पी. थोडे गप्प झाले. त्यांच्या चेह-यावर 'हा कशाला उद्व्याप' असे भाव दिसले. पण मी त्यांना काही बोलू दिल नाही आणि तो विषय तिथेच संपवला. हेतू असा की, कुलकर्णी बोलले नाहीत म्हणजे त्यांची समंती आहे. असे समजून त्याचा फायदा घ्यावा.

पुढे एकदा मी त्या प्रियकर मुलाला बोलावून त्याच्याशी बोलणं केलं. तो मोठा हुशार आणि चटपट्या मनुष्य. त्याचे नाव व्यंकट बोरकर त्याच्याकडून काही प्रसंग उद्भवेल असं वाटलं नाही.

एकदा रेखाच्या घरी तिचे लांबचे नातेवाईक आले होते. त्यातील एका महिलेला आमचा या प्रकरणातील भाग कळल्यावर ती आमच्याकडे आली आणि तिने आमच्या खटपटीला पूर्ण पाठिंबा दिला. हा काडीचा आधारही उपयोगाचा वाटला.

एके दिवशी, फारस कुणाला कळू न देता, मी आणि (डी. एस. पी.) कुलकर्णी यांनी एका ब्राह्मणाला बोलावून मुलाच्या घरी हे लग्न लावून दिलं. लग्नाला आम्ही दोघं उपस्थित आहोत म्हटल्यावर मुलीच्या भावाचं काही चाललं नाही. मात्र मुलीकडचे कोणीही लग्नाला हजर राहिले नाहीत. मुलाचे दोन-तीन मित्र मात्र हजर होते.

विचार केला, चला आता हे जोडप सुखाने संसार करील. थोड स्थिरस्थावर झालं की, हा चटपट्या व्यंकट आपल्याला सहजासहजी विदर्भातल्या शेतीच स्वरूप काय, उत्पन्न काय, रितीरिवाज कसे आहेत, शेतक-याचं राहणीमान कसं असत त्याबद्दल सविस्तर सांगेल.

(२)

बेटा, (बेटा कसला म्हणा, वय अंदाजे ४४/४५) एके दिवशी बायकोला घेऊन घरी आला. रात्री ८ ची वेळ होती. मी बंगल्यासमोरच्या गार हिरवळीवर फे-या मारत होतो.

"या व्यंकटराव, खुर्च्या पाणी मागवतो."

"नाय साहेब, आपला जास्त वेळ घेत नाही. हिला वहिनींना भेटायचं होत म्हणून आलो, मी थांबतो. तुमच्या

फिरण्याचा परिपाठ चालू द्या." — व्यंकट.

"तोवर खुर्च्या, पाणी आलं."

"बसा हो, कसं काय चाललयं? लग्नानंतर घरात किंवा सासूरवाडीला काही वातावरण बिघडलं नाही ना?"

"छे हो, तसं काहीच घडलं नाही. सगळं स्विकारलेलं दिसतयं तिच्या आई-वडिलांनी आणि भावानं. अर्थात हे सगळं तुम्ही लग्नाला हजर होता म्हणून सगळं जमलं. एवढ्या मोठ्या पोस्टवरच्या व्यक्ती सामान्य माणसाच्या लग्नाला कुठून येणार? अगदी घरातल्या पोक्त माणसानं कठीण प्रसंग पार पाडावा तसं तुम्ही आणि डी. एस. पी. साहेबांनी आमचं लग्न लावून दिलत! मला तर तुमचे आभार कसे मानावेत हेच कळत नाही!" — व्यंकट.

"ते राहू द्या हो! लग्नाच्या गाठी ब्रह्मदेवानं बांधलेल्या असतात. तुमच्याकडे ब्रह्मदेवाचं लक्ष गेलं आणि सगळं झालं."

"व्यंकट हसला आणि म्हणाला, असं करतो साहेब, आपल्याला शेतीबद्दल बोलायचंय ना? मी हिला तिच्या आईकडे पाठवून देतो. माझं घरही जवळच आहे. निवांत बोलू. नंतर मीही माझ्या घरी जाईन."

असं म्हणून व्यंकट घरात गेला. सगळं मार्गी लावून परत आला. "त्याचं काय आहे साहेब, मेहेकरजवळ माझी जी शेती आहे त्यावर भागणार नाही, म्हणून मी बुलढाण्याला शिफ्ट झालो. तिथं दोन-तीन उद्योग केले आणि आता रियल इस्टेटच्या धंद्यात स्थिरावलो. पण माझं सगळं लक्ष गावच्या शेतीकडेच असतं."

"लग्नाअगोदरच माझं रेखाकडे येणं जाणं होतं. ती माझ्यावर भाळली ही गोष्ट खरीच; पण मला ते अवघडल्यासारखं वाटायचच. असं होतं की, तिच्या लहानपणी ती मला 'मामा' म्हणायची आणि ते बरोबरचं होतं. वर्षा-दीडवर्षापूर्वी तिनं मला एक जाहिरात दाखवली होती. इकडच्या भागात पाणी कमी उन्हाळा कडक. पण अशा स्थितीतही चांगलं येणारं पीक म्हणजे 'ॲलोव्हेरा' म्हणजे कोरफड. एका नगरच्या माणसांने वर्तमानपत्रात जाहिरात दिली होती. विदर्भ मराठवाड्यांतल्या शेतक-यांसाठी नामी संधी! अगदी सहजतेनं येणारं कोरफडीचं पीकं! आर्युवैदिक औषधांसाठी आणि सौंदर्यप्रसाधनासाठी उपयुक्त त्या संबंधी करार करून योग्य किंमत देण्यास तयार!"

"रेखाने मला ही जाहिरात दाखवली. तिचा व्यवसाय सुरळीत चालला होता. पण त्यातला थोडा शिलकीतला पैसा या कोरफडीच्या उद्योगात घातला, तर काय वाईट? म्हणून तिचा आग्रह की, कोरफडीची लागवड करावी. मला ही ते पटलं; अशासाठी की, विशेष कष्ट नाहीत आणि लागवड सोपी शिवाय करारानुसार ठराविक रक्कम हाती पडणार."

"मी लगेच संबंधीत जाहिरातदाराला कळवले की, बुलढाण्याला या, शेतक-यांशी बोलून कोरफडीची लागवड करून घेऊ. कराराचा मसूदाही आणावा."

"जाहिरात देणारी व्यक्ती माझ्या घरी तिस-या दिवशी हजर. मी लगेच मुद्द्यावर येऊन त्याला म्हटलं करार बघू द्या."

जाहिरातदार सांगायला लागला की, त्याने मसूदा आणला होता. त्या मसूद्याच्या गोषवारा असा की, कोरफडीची पानं निवडून, खुडून नेण्याची व्यवस्था जाहिरातदार करील. बहुतेक सगळीच पानं वापरण्याजोगी असतात. एखाद अगदीच वाळलेलं पानं निघालं तर ते बाजूला ठेवावं लागतं. दुसरं असं की, तुमच्या प्रॉडक्शनच्या खर्चापेक्षा २०% जास्त रक्कम इतकी किंमत देऊ. सर्व व्यवहार चेकने. आता करार करायचा तो एक वर्षापुरता पीक घेऊन गेल्यावर चार दिवसात चेकने पेमेंट करू. तुमच्या शेतक-यांची कोणत्या बँकेत खाती आहेत ते सांगा.

"अहो, कोरफडीचे खूप उपयोग आहेत. आपल्याला ती टाकाऊ वस्तू वाटते. पण सौंदर्यप्रसाधनात कोरफडीचा चांगला उपयोग होतो. आयुर्वेदातही कोरफडीचं महत्त्व सांगितलं आहे. त्यांच्या औषधासाठी कोरफड लागते. शेतक-यांना त्याची कल्पना नाही. हे पीक सोप पण खूप उत्पन्न देणारं आहे. मला शेतक-यांची व्यथा माहित आहे. मला फायदा होईल आणि शेतक-यांची सेवाही घडेल."

व्यंकट सांगू लागला, "त्या माणसाचं हे लेक्चर ऐकून मी सर्द झालो. आपल्या नजरेतून हे पीक कसं

सुटलं याची मला खंत वाटली. मी लगेच कामाला लागलो. पुणे, नाशिक, औरंगाबाद इकडे रोपांची चौकशी केली. रोपं मिळतात असं म्हटल्यावर आसपासच्या शेतक-यांशी बोललो. मग एक दिवस मेहेकरला शेतक-यांची बैठक घेतली. कोरफडीच्या लागवडीची माहिती सांगितली. ५२ शेतकरी कोरफडीचं पीक घ्यायला तयार झाले. १२० ते १३० एकर जमीन कोरफडीखाली आणायचं ठरवलं. आम्ही ४/५ जण रोपं विकत आणायला गेलो. रोपं आणून वाटली. शेतकरी उत्साहात आले. एका वर्षात सगळ्यांच्या शेतात कोरफड तरारून आली."

"मी त्या जाहिरातदाराला फोन करून सांगितलं चार-आठ दिवसात येतो असं त्याचं उत्तरं आलं. आम्ही कोरफडीचा भावही ठरवू लागलो. सारे खुशीत होते."

"चार दिवसानंतर तो जाहिरातदार मला येऊन भेटला त्याने कोरफड खरेदीचा एक प्लॅनच तयार केला होता. त्या प्लॅनप्रमाणे त्याने गावोगावी माणसेही पाठवली. कापणी झाली. काही माल घेऊन तो मनुष्य निघून गेला आता फक्त भाव ठरवायचा होता. चार-आठ दिवस झाले पण ह्या गड्याचा पत्ता नाही फोन केला; तर फोन बंद आहे अशी सूचना मिळायची."

"गडी अहमदनगरचा होता तेव्हा तिथेच त्याच्या पत्त्यावर त्याला गाठाव असं ठरवून आम्ही नगरला गेलो. नगरच्या भागाच नाव बरोबर होतं पण ते घर त्याचा नंबर वगैरे सगळं बोगस होतं आसपासच्या लोकांना विचारलं तर अशी कुणी व्यक्ती तिथेच कधीच राहात नव्हती असं कळलं."

व्यंकट म्हणाला की, त्याने १० एकरात कोरफड लावली होती. तिची तर वाट लागलीच पण त्याच्यावर विश्वास ठेवून आणखी पन्नास लोकांनी कोरफडीचं पीक घेतलं, जिवापाड कष्ट घेतले, त्यांच काय? मला अपराध्यासारखं वाटायला लागलं.

शेवटी मी ठरवलं की, छडा लावयचाच आम्ही नगरला गेलो. पोलीसात गुन्हा नोंदवायचा तर पोलीस म्हणाले, गुन्हा बुलढाण्याच्या हद्दीत आम्ही कशी त्याची नोंद करू? पोलीसी खाक्या! कुठे बेवारशी प्रेत सापडलं तरी त्या गावचा पोलीस पाटील शेजारच्या हद्दीत ते प्रेत ढकलून देईल आणि गुन्हा नोंदवण्याचं टाळेल. शेवटी आम्ही मेहेकरला गेलो आणि तिथल्या पोलीस अधिका-यांला गयावया करून सगळी हकीकत सांगितली. त्याने शेवटी मिनतवारीने गुन्हा दाखल केला. तारखावर तारखा पडू लागल्या पोलीसांना तो बदमाश कुठला सापडायला.

(३)

मध्ये एकदा मेहेकरच्या पोलीस चौकीतून आम्हाला बोलावणं आलं. तिथला अधिकारी म्हणाला की, 'तुम्ही नगरला जा आमचा हवालदार तुमच्या बरोबर येईल.' आम्ही गेलो. आम्ही दोघं-तिघं आणि पोलीस हवालदार सगळ्यांचा जाण्या-येण्याचा आणि जेवणाचा खर्च माझ्याच बोकांडी. दोन-तीनदा हा प्रकार झाला.

वर्ष-दीड वर्ष जंगजंग पछाडले भयंकर त्रास झाला. शेतकरी मात्र माझ्या सोबत होते. त्यांचा माझ्यावर विश्वास होता त्यांनी कोरफडीची लागवड माझ्यापेक्षा खूपच कमी प्रमाणात केली होती म्हणून ते म्हणायचे, 'आमची नाही पीकाची नुकसानी होते. आम्ही ते सोसू. तुम्ही मनावर घेऊ नका.'

"पण काय काय सांगू साहेब? लग्नाअगोदरच्या वर्षातली ही गोष्ट रेखाला सांगावं तर आधीच 'हे लग्न कसं होणार?' हा भूंगा तिच्या मागे लागलेला. त्यामुळे मी तिला काहीच सांगितले नाही."

"लग्न झाल्यावर तिनं मला कोरफड दाखवा असं म्हणून शेतावर नेलं. बहुतेक सगळी कोरफड वाळून गेलीच होती. आता रेखा 'सगळं काही सांगून टाका असं म्हणत मागे लागली. काय करतो सगळं सांगावं लागलं. तिला खूप वाईट वाटलं' मी जाहिरात वाचून दाखवली म्हणून हे सगळं झालं.' असं म्हणून ती खंत करू लागली."

व्यंकट म्हणाला की, आता त्याने हा विषय संपवलाय त्याचे दीड-दोन लाख रुपये गेले. पण आता तो धडा शिकलाय.

विदर्भातला तो उद्योगी पण सरळमार्गी शेतकरी. त्याच्या वाट्याला हे असलं अपयश यावं याचे मला फार दुःख झालं. "तुम्ही अजिबात दुःखी होऊ नका साहेब. अवकाळी पाऊस झाला तर नाही का नुकसान होत? सवय आहे आम्हाला त्याची." - व्यंकट म्हणाला.

व्यंकट माझ्या पाया पडला. मी त्याला मनापासून आशिर्वाद दिले आणि तो निघून गेला.










# चोम्स्की

अशोक कृष्णाजी जोशी

(१)

चोम्स्कीची बौद्धिक व सामाजिक कारकिर्द दीर्घ आहे, हे आपण पाहिले आहे. या दीर्घ कारकिर्दीत त्याच्या सिद्धान्तावर अनेकांनी लिहिणे, त्याच्या बरोबर अनेक भाषाशास्त्रज्ञांचे वाद होणे व त्याच्याशी अनेकांच्या चर्चा होणे, हे अपेक्षितच आहे. यातील काही निवडक घटनांची इथे दखल घेणे शक्य आहे. ह्या चर्चा व वाद चोम्स्कीच्या भूमिकेवर नीट प्रकाश टाकतात म्हणून, त्यांची निवड केली आहे.

चोम्स्कीची वैचारिक भूमिका स्पष्ट आहे. तो बुद्धिवादी परंपरेतला, प्रबोधन (एनलायटनमेंट) परंपरेतला विचारवंत आहे. फ्रेंच तत्त्वज्ञ रूसो व जर्मन तत्त्वज्ञ कांट यांची परंपरा तो मान्य करतो व त्यांच्याप्रमाणेच मानवी स्वातंत्र्य हे महत्त्वाचे मूल्य आहे, असे तो मानतो. बुद्धिवादावर आधारित समाजरचना आज ना उद्या मानव प्रत्यक्षात आणू शकेल यावर त्यांचा दृढ विश्वास आहे. (दि इसेन्शिअल चोम्स्की, पा. ७९-८१)

कांट व रूसो या दोन मोठ्या तत्त्वज्ञांप्रमाणे एकोणिसाव्या शतकातील विल्यम हंबोल्ट या तत्त्वज्ञ व भाषाशास्त्रज्ञाचाही त्याच्यावर मोठा प्रभाव आहे. हंबोल्टचे तीन मुद्दे चोम्स्कीने स्वीकारले होते.

१) माणसाच्या व्यक्तिमत्त्वाचा सर्वांगीण विकास, त्याचे पूर्णत्व, त्याची समृद्धी हे आधुनिक समाजाचे श्रेयस आहे, आधुनिक समाजाचे ते ध्येय आहे, असे हंबोल्ट मानत होता. सर्व माणसाना उच्चार व विचारस्वातंत्र्य असले पाहिजे, ते स्वातंत्र्य सर्व माणसाना मिळाले पाहिजे, हे प्रबोधनातील एन्लायटनमेन्टचे - तत्त्व तो मानीत होता. हंबोल्टची ही व्यक्तिस्वातंत्र्याची कल्पना चोम्स्कीला मान्यच होती. माणूस मूलतः सर्जनशील, शोध घेत राहणारा व शिक्षणाने आपल्या व्यक्तिमत्त्वात सतत सुधारणा घडवून आणणारा व पूर्णत्वाकडे जाण्याचा प्रयत्न करणारा प्राणी आहे, हे हंबोल्ट व चोम्स्की या दोघांनाही मान्य होते.

२) हंबोल्टचा दुसरा मुद्दा असा होता की, राज्य व शासनसंस्थेने तसेच इतर सामाजिक संस्थांनी माणसाच्या आचारांवर, विचारशक्तिंवर, सर्वांगीण विकासावर बंधने घालू नयेत. चोम्स्कीचेही हेच मत आहे.

३) हंबोल्टचा तिसरा मुद्दा माणसाच्या भाषाशक्तीबद्दल आहे. माणसाच्या मनात ब-याच शक्ती सुप्त रूपात - (इन्नेट) स्वरूपात - असतात. भाषाशक्ती ही अशीच सुप्त वा इन्नेट शक्ती आहे. आपल्या जवळ असणा-या मर्यादित साधनांचा वापर करून माणूस अमर्यादित स्वरूपाचे उद्दिष्ट गाठू शकतो. इतर सुप्त शक्तींप्रमाणे भाषाशक्तीबाबतही असे घडते, असे चोम्स्कीचेही म्हणणे आहे. (पा. ८९-९०)

या लेखाच्या केंद्रस्थानी चोम्स्कीची भाषाशास्त्रीय भूमिकाच आपण ठेऊ. (चोम्स्कीच्या इतर विषयासंदर्भातील भूमिकांचा विचार इथे अभिप्रेत नाही. त्याच्या इतर क्षेत्रातल्या भूमिका जरी महत्त्वाच्या असल्या, तरी त्या भाषाशास्त्र संदर्भात आनुषंगिक स्वरूपाच्याच समजणे शक्य आहे.) व त्यांच्या संदर्भात झालेल्या चर्चांचा व वादविवादांचा विचार इथे करू. एक मोठा भाषाशास्त्रज्ञ म्हणून या लेखात आपण चोम्स्कीकडे पाहत आहोत.

जोन सर्ल हा अलीकडच्या ३ एक दशकातला मोठा भाषाशास्त्रज्ञ समजला जातो. (याच्या आधीच्या काळात ब्लूमफिल्ड व सपिअर हे वर्णनात्मक भाषा-विज्ञानाचा पाया रचणारे भाषाशास्त्रज्ञ म्हणून प्रसिद्ध होते व भारतातल्या आधुनिक भाषाशास्त्र अभ्यासावर त्यांचा फार मोठा प्रभाव होता.) ओस्टीन या भाषाशास्त्रज्ञा-बरोबर सर्ल हा पण स्पीच ॲक्ट थिअरी या भाषाशास्त्रीय सिद्धान्ताचा आद्य पुरस्कर्ता मानला जातो. (वाचिक कृतीसिद्धान्त - म्हणजे स्पीच ॲक्ट थिअरी - ओस्टीन व सर्ल हे या सिद्धान्ताचे मुख्य प्रवक्ते मानले जातात. भाषेचा वापर करणे, भाषेचा उपयोग करणे ही एक

कृतीच आहे, असे हा सिद्धान्त मांडतो. मी संमेलनाचे उद्‌घाटन करीत आहे, मी आपले स्वागत करीत आहे, ही वाचिक कृतीची उदाहरणे आहेत. विधानांच्या सत्यासत्यतेपेक्षा उचितता हा निकष या वाचिक कृती सिद्धान्ताबाबत महत्त्वाचा असतो.) द न्यूयॉर्क टाईम्स रिव्यू ऑफ बुक्स या प्रसिद्ध साप्ताहिकात सर्लने 'चोम्स्की'ज 'रेवोल्यूशन इन लिंग्विस्टिक्स' हा लेख २९ जानेवारी १९७२ ला लिहिला होता.

त्या लेखात सर्लने म्हटले आहे की, चोम्स्की हा मनवादी भाषाशास्त्राचा जनक व पुरस्कर्ता मानला आहे. मनवादी भाषाशास्त्राचा - मेंटॅलिस्टिक लिंग्विस्टिक्सचा - जनक समजला गेलेला चोम्स्की वर्तनवाद प्रभावी असलेल्या काळात आपला वेगळा मनवादी सिद्धान्त मांडत होता. वर्तनवादाविरुद्ध व अनुभववादाविरुद्ध (एंपिरिसिझम) जाऊन तो भाषाशास्त्रात वेगळी भूमिका घेत होता. प्रत्यक्ष भाषाव्यवहाराच्या जागी (परफॉर्मन्स) भाषाक्षमतेचे तत्त्व (कॉम्पिटन्स) तो पुरस्कारित होता. चोम्स्कीने भाषाशास्त्रात असे करणे क्रांतिकारक स्वरूपाचे व अतिशय महत्त्वाचे होते, हे सर्ल मान्य करतो. म्हणूनच सर्लने चोम्स्कीच्या भूमिकेचे विवेचन आपल्या लेखात केले आहे.

१) चोम्स्कीने प्रत्यक्ष भाषाव्यवहार (पर्फोमन्स) व भाषिक क्षमता (कॉम्पिटन्स) यात नेमका फरक केला. १९५० च्या दशकात जे वर्तनवादी (बिहेविअरिस्ट) व अनुभववादी विचाराचे (विधानांची सत्यासत्यता अनुभवाच्या निकषावर तपासणे, हा अनुभववादाचा केंद्रबिंदू आहे) वातावरण सर्वच ज्ञानक्षेत्रात निर्माण झाले होते, त्याला वेगळे मनवादी - मेंटॅलिस्ट - वळण चोम्स्कीने दिले. भाषेचे वरवर न दिसणारे नियम व भाषिक क्षमता यावर त्याने दिलेला भर फार क्रांतिकारक व महत्त्वाचा ठरला.

२) भाषाप्रयोगाच्या नमुन्यावर आधारित शोधन साधने त्यावेळी अस्तित्वात असलेले रचनावादी भाषाशास्त्र वापरत होते. रचनावादी भाषाशास्त्र वापरत असलेली शोधन साधने व त्याची शोधनपद्धती - डिस्कव्हरी प्रोसिजर्स - चोम्स्कीने वापरली व भाषाप्रयोगातल्या (म्हणजेच भाषेचा प्रत्यक्ष वापर असलेल्या) वाक्य या घटकातील दडलेला किंवा तळाखालचा भाग हा पृष्ठभागी किंवा (प्रत्यक्ष स्वरूपातल्या वाक्यातील) वरवर दिसणा-या भागापेक्षा अधिक महत्त्वाचा असतो, अशी भूमिका त्याने घेतली, हे लक्षणीय आहे.

३) चोम्स्कीच्या लक्षात आले की, समकालीन भाषाशास्त्र मॉर्फिम (स्वनीम) - फोनीम (ध्वनी) ह्याच गोष्टी आपल्या सिद्धान्तासाठी घेते. वाक्याविषयी समकालीन भाषाशास्त्र बोलतच नाही. वाक्या-वाक्यांचा काय संबंध असतो, त्याविषयी हे समकालीन रचनावादी भाषाशास्त्र (स्ट्रक्चरॅलिस्ट लिंग्विस्टिक्स) कुठलेही सिद्धान्तन करीत नाही.

४) चोम्स्कीने आपल्या भाषाशास्त्रीय सिद्धान्तनात प्रथम भाषा किंवा 'मातृभाषा' म्हणून भाषेचा वापर करणा-या 'नेटिव' भाषकाचा विचार करताना असे म्हटले आहे की, त्या नेटिव भाषकाला त्या भाषेचे व्याकरण नियम व वाक्यरचना नियम आपोआपच मिळालेले असतात; ते नियम त्याच्या नेणीवेचा भाग असतात. आपल्या भाषेचा वापर करीत असताना तो भाषक नियमांनी बांधलेला नसतो; तो मुक्तपणे भाषा वापरतो; नवी वाक्ये तो घडवत असतो व अगदी मोकळेपणे अभिव्यक्त होत असतो.

५) त्या भाषकाने वापरलेल्या भाषेचे नियम भाषाशास्त्रज्ञाला शोधावे लागतात. त्या वेळी अस्तित्वात असलेल्या रचनावादी भाषाशास्त्रज्ञांच्या वाक्यांशाच्या रचनेवर आधारलेल्या - फ्रेज स्ट्रक्चर - व्याकरणापेक्षा चोम्स्कीचे जनरेटिव किंवा टी. जी. व्याकरण (म्हणजे वाक्याचा तळाचा भाग किंवा दडलेला भाग पृष्ठभागी व्यक्त होणा-या भागात कसा रूपांतरित होतो किंवा ट्रांसफॉर्म होतो, हे दाखवणारे व्याकरण) वेगळे आहे, कारण ते वाक्यांशामधले (फ्रेज स्ट्रक्चर) स्थानबदल (ट्रांसफर्मेशन) का व कसे केले जातात, हे स्पष्ट करते. वाक्यांच्या तळाचा किंवा दडलेला भाग (डीप स्ट्रक्चर) पृष्ठभागी (सर्फेस स्ट्रक्चर) कसा येतो, प्रत्यक्ष व्यवहारात तो कसा येतो वा कसा वापरला जातो, हे चोम्स्कीच्या टी. जी. व्याकरणाने स्पष्ट होते. म्हणून चोम्स्कीला आपले जनरेटिव किंवा टी. जी. व्याकरण अस्तित्वातल्या इतर व्याकरणांपेक्षा अधिक चांगले आहे, असे वाटते.

सर्लने हे ५ मुद्दे चोम्स्कीच्या सिद्धान्तनातले प्रमुख मुद्दे म्हणून मांडले आहेत. सर्लने चोम्स्कीच्या सिद्धान्तावर त्या लेखात ४ मुख्य आक्षेप घेतले आहेत.

१) वाक्यरचना - सिंटॅक्स व वाक्यार्थ - सेमँटिक्स - यात चोम्स्कीने जो भेद आपल्या सिद्धान्तात दाखवला आहे, तो पटणारा भेद नाही, असे सर्लचे म्हणणे आहे. वाक्यरचना व वाक्यरचेनेचे कार्य यात चोम्स्की जो भेद दाखवतो तो पटत नाही, असे सर्लचे म्हणणे आहे. वाक्यरचना (फॉर्म) व वाक्यरचनेचे कार्य (फंक्शन) या द्वैताचा चोम्स्कीने अधिक चिकित्सक विचार करायला हवा होता, असे सर्लला वाटते.

२) देकार्त व लायब्निझ या १७ व्या शतकातील मनवादी तत्त्वज्ञांच्या परंपरेतला चोम्स्की हा तत्त्वज्ञ असून तो जॉन लॉक परंपरेतला अनुभववादी किंवा प्रत्यक्ष अनुभवावर अधिक भर देणारा विचारवंत नाही, असे सर्ल स्पष्ट करतो.

३) संदेशवहनात किंवा भाषावापरात भाषेचा वापर करणारा भाषक (स्पीकर) फार महत्त्वाचा असतो, असे चोम्स्कीने आग्रहाने मांडायला हवे होते, असे सर्लचे मत आहे. [भाषाव्यवहार व संदेशवहन (लँग्वेज युज किंवा स्पीच व कम्युनिकेशन) यातला संबंध दाखवून भाषिक कृतीवर (स्पीच ॲक्ट) व भाषावापर करणा-याच्या हेतूवर स्पीच ॲक्ट सिद्धान्ताचा एक जनक असणा-या सर्लने आपल्या लेखात भर देणे स्वाभाविक होते.]

४) चोम्स्कीने प्रत्यक्ष भाषाव्यवहाराचा विचार न करता - म्हणजे भाषेचा आशय वा अर्थ न पाहता - भाषेला चोम्स्कीने आकारिक स्वरूपात, अमूर्त स्वरूपात, भाषेच्या रचनेच्या स्वरूपातच पाहिले व अभ्यासले. प्रत्यक्ष संदेशवहनात भाषेचा व तिच्यातील वाक्यांचा कसा उपयोग केला जातो, हे त्याने पाहिले नाही हा सर्लचा एक प्रमुख आक्षेप चोम्स्कीच्या भाषाविषयक सिद्धान्तावर आहे. भाषा वापरणा-याचा, म्हणजेच ती भाषा बोलणा-याचा हेतू व भाषावापर, संदेशवहन, भाषानियम यांचा नेमका काय संबंध असतो, हे चोम्स्कीने स्पष्ट केले नाही; भाषेचा आशय व अर्थ यासंबंधी त्याच्या सिद्धान्तातून काही मिळत नाही, हा सर्लचा आक्षेप आहे.

सर्लच्या आक्षेपांचा विचार करताना असे ध्यानात येते :

१) भाषाशास्त्र व व्याकरण इतर शास्त्रांप्रमाणे सतत प्रगत होणारे शास्त्र आहे. ते पूर्णत्वास पोचले आहे, असा दावा करता येत नाही. (कोणतेही शास्त्र प्रगत होत असते, बदलत असते, त्याचा शेवटचा टप्पा नसतो, ते पूर्णत्वास पोचत नसते.) आज त्यातले प्रगत संशोधन काय आहे एवढेच आपण जाणू शकतो. त्या अभ्यासाचा शेवटचा टप्पा असा काही नाही. चोम्स्कीचे टी. जी. ग्रामर हा त्या भाषाभ्यासातील आज प्रगत असलेला एक टप्पा आहे. चोम्स्कीचे व्याकरण वर्णनात्मक भाषाविज्ञान व रचनावादी भाषाविज्ञान यांच्या पुढला टप्पा आहे, ते अधिक प्रगत आहे, असे म्हणता येईल. यापुढे अधिक प्रगत भाषाविज्ञान व अधिक प्रगत व्याकरण अस्तित्वात येणारच आहे.

२) स्पीच ॲक्ट थिअरीचा सर्ल हा एक मुख्य जनक असल्याने तो सिद्धान्त खरा आहे, निरपवाद आहे, असे त्याने समजणे अगदी स्वाभाविक आहे. पण त्या थिअरीच्या कोषातच तो अडकलेला दिसतो. समाज-विज्ञानाच्या अभ्यासातील वर्तनवादाच्या दिशेने चाललेली लाट थोपवून मनवाद किंवा मेंटॅलिझमच्या दिशेने केवळ भाषाशास्त्राचा नव्हे, तर समाजशास्त्रांचा व मानव्यविद्यांचा अभ्यास वळवण्याचे फार मोठे काम चोम्स्कीने केले, हे लक्षात घेणे आवश्यक आहे किंवा मेंटॅलिझमच्या दिशेने केवळ भाषाशास्त्राचा नव्हे, तर समाजशास्त्रांचा व मानव्यविद्यांचा अभ्यास वळवण्याचे फार मोठे काम चोम्स्कीने केले, हे लक्षात घेणे आवश्यक आहे.

३) संदेशवहन व वाक्याचा अर्थ याबद्दलचे सर्लचे विवेचन योग्यच आहे. पण आजवर कोठल्याही सिद्धान्ताला संदेशवहनाचे व वाक्यांचे स्वरूप नेमकेपणाने स्पष्ट करता आले नाही, हे वास्तव स्वीकारावे लागते. संदेशवहन व वाक्यार्थ हा धूसरतेचा व अस्पष्टतेचा प्रदेश म्हणून बराच काळ राहणार असे दिसते. चोम्स्कीच्या सिद्धान्ताने भाषेची रूपात्मक वा आकारिक बाजू पाहिली व संदेशवहन आणि वाक्यार्थ यांकडे लक्ष दिले नाही हा सर्लचा आक्षेप विचार करण्यासारखा आहे. पण त्याच बरोबर हे पण खरे की, संदेशवहन व वाक्यार्थ यांच्याबाबतीतला आजवरचा कोठलाही सिद्धान्त समाधानकारक नाही. वास्तवाची ही जाणीव सर्लच्या विवेचनातून व्यक्त होत

नाही, असे म्हणता येते.

(२)

लेखाच्या या भागात आपण चोम्स्की व मिशे फुको यांच्यातील १९७१ मधील एका प्रसिद्ध चर्चेचा (डिबेटचा) विचार करू. आंतरराष्ट्रीय तत्त्वज्ञानविषयक प्रोजेक्ट मधला हा तिसरा डिबेट किंवा तिसरी चर्चा होती. दोन दिग्गज विचारवंतांमधली ही चर्चा होती. कॉलेज ऑफ फ्रान्सने आंतरराष्ट्रीय तत्त्वज्ञानविषयक प्रोजेक्ट मधील ही तिसरी चर्चा घडवून आणली होती. केवळ भाषाशास्त्राला नव्हे, तर सर्व सामाजिक विज्ञानांना व मानव्यविद्याना नवे मनवादी विचारवळण देणारा विचारवंत चोम्स्की या चर्चेत एका बाजूला; तर १९८० व १९९० या दोन दशकांतील विचारसरणींवर व सिद्धान्तांवर आपला मोठा प्रभाव टाकणारा तितकाच प्रभावशाली विचारवंत मिशे फुको दुस-या बाजूला अशी ही दोन मोठ्या विचारवंतांतली आमने सामने राहून झालेली चर्चा फार लक्षणीय होती.

माणसाचा मूळ स्वभाव वातावरण घडवतो का? माणसाच्या मनाची रचना, त्याचे जन्मदत्त गुण-इनेट आयडीयाज-त्याचा स्वभाव घडवायला कारणीभूत ठरतात का? हा त्या चर्चेतला मुख्य मुद्दा होता.

यातील चर्चा करणारा फुको हा विचारवंत अलिकडचा किती महत्त्वाचा सैद्धान्तिक व मोठा विचारवंत होता ते आपण प्रथम पाहू.

विसाव्या शतकाच्या शेवटच्या दोन दशकातल्या विचारांवर फुकोचा विशेष प्रभाव पडला होता. त्याने उत्तर संरचनावादी (पोस्ट-स्ट्रक्चरॅलिस्ट). स्त्रीवादी (फेमिनिस्ट), उत्तर-आधुनिक (पोस्ट-मॉडर्निस्ट) व उत्तर-वसाहतवादी (पोस्ट-कलोनिअलिस्ट) विचार व चळवळी विशेष प्रभावित केल्या. सत्ता सर्व गोष्टींचे नियंत्रण करते, ज्ञानक्षेत्राचेही नियंत्रण सत्ताच करीत असते हा त्याचा क्रांतिकारक विचार इतिहासक्षेत्रातही महत्त्वाचा ठरला आहे. त्याने प्रभावित केलेला नव - इतिहासवाद इतिहास लेखनाच्या नव्या पद्धतीला जन्म देणारा विचार ठरला आहे.

इतिहास, कल्पना, विचारप्रणाल्या, सिद्धान्त या सर्व गोष्टी अखेरीस संरचिते (कंस्ट्रक्शन्स) आहेत, प्रतिमाने (इमेजेस) आहेत अशी भूमिका फुकोने घेतली. (म्हणजे माणसांनीच या गोष्टी तयार केलेल्या आहेत. या गोष्टी मानवेतरांनी तयार केल्या नाहीत, असे त्याचे म्हणणे होते.) प्रगती, वास्तव किंवा वस्तुनिष्ठता, विज्ञाननिष्ठा या मानवरचित कल्पनांविषयी फुकोने अविश्वास व्यक्त केला. इतिहास हा विषय व मानवी मनाची रचना विचारात घेतली तर असे आढळते की, इतिहासाची अनेक रूपे असतात, एकाच वस्तुस्थितीविषयी परस्पर विरोधी मते व्यक्त करणे, वेगवेगळे अर्थ लावणे आपल्याला वास्तवात आढळत असते असे फुको म्हणतो. वास्तवाचे एकसत्त्वि-करण करणे, त्याचा एकच अर्थ लावणे, त्याचे एकच रूप खरे मानणे व इतर रूपे खरी नाहीत, असे मानणे फुकोला मान्य नव्हते. शासितांच्या व दलितांच्या, सर्वसामान्य आयुष्य न जगणा-या माणसांच्या संभाषितांना समाजात अवकाशच दिला जात नाही, वाव दिला जात नाही, आपल्या कल्पनांना अभिव्यक्त करायलाच त्यांना संधी दिली जात नाही, हे अनेक उदाहरणे देऊन त्याने स्पष्टपणे मांडले आहे. दमन व अनुशासन या शस्त्रांचा वापर करून सत्ता विरोध मोडून काढते; सत्ता माणसाचे स्वत्व विकास पावू देत नाही; माणसाला स्वातंत्र्य या श्रेयापासून सत्ता दूर ठेवते हे त्याचे निरीक्षण त्याला सांगत होते.

या चर्चेतला दुसरा विचारवंत चोम्स्की प्रबोधन परंपरेतला मानवतावादी व मनवादी विचारवंत (मानवी मनच विचारांचे उगमस्थान आहे; बरेच वेळा विचार प्रत्यक्ष अनुभवावर अवलंबून नसतात ही भूमिका घेणारा) आहे. त्याने माणसाच्या मनाला व मनशक्तींना फार महत्त्व दिले आहे. त्याने भाषाशास्त्रात मनवादी भूमिका घेतली आहे. फुको व चोम्स्की यांच्यामधील वादविवादात चोम्स्कीने जे मुद्दे मांडले होते, त्यांचा विचार इथे प्रथम करू.

१) चोम्स्कीच्या मते संकल्पना, रचना वा संरचना या मनात असतात (इनेट असतात); विशिष्ट भाषा वापरणारा मानवी समूह व विशेषकरून त्या समाजातले प्रौढ लोक काही भाषिक संरचना समान रीतीने वापरतात वा शेअर करतात. त्या समाजाचे सारे बौद्धिक, सामाजिक व वैयक्तिक जीवन याप्रकारेच बनत असते. सर्व

समाजगटांबाबत हे खरे आहे. प्रत्येक व्यक्तीला जन्मतःच काही बौद्धिक, मानसिक शक्ती, सामर्थ्ये मिळालेली असतात. त्यांचा उपयोग करून समाजात प्रचलित असलेल्या गोष्टी मिळवून ती व्यक्ती आपले सारे व्यवहार आपण वावर करीत असलेल्या मानवी समूहात करीत असते, हे चोम्स्की नोंदवतो.

२) भाषेचा सिद्धान्त मांडणारा चोम्स्की आपला योग्य पूर्वसूरी शोधताना जर्मन भाषाशास्त्रज्ञ विलिअम हंबोल्ट या १८-१९ व्या शतकातील सैद्धान्तिकाकडे वळला. भाषेला एक अंतर्गत व (माणसाने) आत्मसात केलेले रूप (इंटर्नलाईझ्ड फॉर्म) असते, असे हंबोल्टने म्हटले होते. हा सिद्धान्त चोम्स्कीला आपल्या भाषाविषयक मताला जवळचा वाटला. भाषेतून व्यक्त होणारी माणसाची सर्जनशीलता जैविक (जेनेटिक) असते, हे चोम्स्कीचे मत भाषेचे अंतर्गत रूप माणूस आत्मसात करीत असतो या हंबोल्टच्या मताला जवळचे आहे, हे स्पष्टच आहे.

३) चोम्स्कीने नव्या संशोधनाचा आधार घेऊन मांडले आहे की, भाषा प्राप्त करण्याचे उपकरणच (लँग्वेज ॲक्विझिशन डिवाइस) माणसाच्या मेंदूत असते व वयाच्या १२ वर्षांपर्यंत आजूबाजूला बोलली जाणारी, वापरात असलेली भाषा माणूस सहज आत्मसात करीत असतो. ती भाषा शिकण्यासाठी त्या माणसाला व्याकरण नियम शिकावे लागत नाहीत. सहजपणे ती आजूबाजूची भाषा तो माणूस (म्हणजे ते मूलच) आत्मसात करीत असतो. मर्यादित शब्दसाठा व मर्यादित वाक्यरचनेपासून सुरूवात करून भाषा वापरणारा तो माणूस अमर्याद शब्दसाठा व अमर्याद वाक्यरचना इथपर्यंत प्रवास करतो. कारण माणसाकडे जन्मजात सर्जनक्षमता-निर्मितिक्षमता असते. भाषा वापरण्याबाबत शिक्षित-अशिक्षित असा भेद करता येत नाही, एखादी संस्कृती प्रगत व एखादी संस्कृती अप्रगत असाही भेद होऊ शकत नाही, असेही चोम्स्कीचे म्हणणे आहे.

४) चोम्स्कीची भूमिका मानवतावादी आहे. सर्जनशील विचार व सर्जनशील कृती करणे हा मानवी स्वभाव आहे, असा त्याचा पक्का विश्वास आहे. अमर्याद सत्ताकांक्षा, दमन, दहशत व विनाशकारी कृती करण्याची काही माणसांची व काही मानवी संस्थांची तयारी असते हे पण त्याला माहीत आहे. विषमता पोसली जाणा-या समाजात आपण राहतो याची त्याला जाणीव आहे. पण याच समाजात आपल्याला मानवी स्वातंत्र्य, सर्जनशीलता व डिग्निटी ह्या मूल्यांची जोपासना करायची आहे व या मूल्यांना महत्त्व देणारा समाज निर्माण करायचा आहे, हे पण त्याला माहीत आहे. या कामाचा रस्ता फार अवघड आहे, हे तो जाणून आहे.

५) मानवी शक्ती अमर्याद नसून तिला मर्यादा आहेत हे तो जाणतो. हे सत्य गृहीत धरूणच आपल्याला आदर्श समाजनिर्मितीचे ध्येय समोर ठेवायचे आहे; न्याय व सत्य या मूल्यांची कास धरायची आहे; सर्वात आधी आपण सर्वांना योग्य न्याय देणारी न्यायव्यवस्था निर्माण करायचा प्रयत्न केला पाहिजे, असे त्याचे मत आहे.

६) आजच्या तंत्रज्ञानप्रधान समाजात श्रमिकांची नेमकी भूमिका काय आहे व पुढे ती कशी असणार आहे हा आजचा महत्त्वाचा प्रश्न आहे, हे त्याला समजले आहे. अमर्याद शक्तीच्या शासनसंस्थेसमोर एक व्यक्ती जेव्हा उभी ठाकते, तेव्हा त्या व्यक्तीला पाठिंबाच असला पाहिजे असे त्याचे मत आहे. उदारमतवादाचा पुरस्कार करणे आज फार आवश्यक असून लोकशाहीला आपला पाठिंबाच असला पाहिजे, असे त्याचे ठाम मत आहे. सत्ताकांक्षा, लालसा, विध्वंसक प्रवृत्ती या मानवी दुर्गुणांना हुकुमशाही खतपाणी घालते, म्हणून चोम्स्कीला हुकुमशाही राजव्यवस्था त्याज्य वाटते. मानवी सद्गुणांचे पोषण लोकशाही करीत असते, म्हणून त्याला ती स्वीकारार्ह वाटते.

चोम्स्की - फुको चर्चेत चोम्स्कीने ही मते व्यक्त केली होती. आता या चर्चेतला दुसरा विचारवंत फुको याने या चर्चेत काय मत व्यक्त केले होते ते पाहू.

फुकोने म्हटले होते की, मानवी मन व मानवी स्वभाव या वैज्ञानिक संकल्पना नसून त्या ज्ञानक्षेत्रातल्या - एपिस्टेमॉलजी मधल्या - संकल्पना आहेत. वैज्ञानिक संकल्पनांना सत्य असत्याची, ख-या-खोट्याची कसोटी लावता येते; पण धर्मशास्त्र (थियॉलजी), प्राणिशास्त्र (बायोलजी) व इतिहास या ज्ञानक्षेत्रात गणल्या गेलेल्या विषयांना ती ख-या-खोट्याची कसोटी लावता येत नाही. या विषयातले भाषित-डिसकोर्स-मानवी मनाच्या संदर्भात

वापरले जाते. त्या भाषिताचे स्वरूप शास्त्रातल्या संभाषितापेक्षा वेगळे असते; ते भाषित फार वेगळेच असते असे फुको म्हणतो. ज्ञानक्षेत्रातली भाषिते व चर्चा वैज्ञानिक असू शकत नाही. पण ती ज्ञानभाषिते कमी दर्जाची नसतात, असेही फुको स्पष्टपणे म्हणतो. (फुको ज्ञानक्षेत्रात काम करीत होता व तो वैज्ञानिक नव्हता, हे आपण लक्षात ठेवले पाहिजे.)

फुकोचा दुसरा मुद्दा असा आहे : चोम्स्की वापरत असलेले शब्द-सत्याचा शोध, मूलभूत वेगळा विचार करणारा माणूस, ज्ञानाचा शोध घेणारा माणूस, सर्जनशील माणूस-स्पष्ट नाहीत; त्यांचा अर्थ हे न सुटलेले कोडेच आहे, असे तो म्हणतो.

'कल्पनांचा विकास होणे', 'ज्ञानाची प्रगती होणे' या चोम्स्कीच्या कल्पना फुकोला मान्य नाहीत. या कल्पनांना तो अमूर्त कल्पना मानतो व प्रत्यक्ष व्यवहारात या कल्पनांचे रूपांतरण किंवा बदललेले रूप-ट्रान्स्फर्मेशन -आपल्या अनुभवास येते, असे ठाम मत फुको व्यक्त करतो. कल्पनांचा विकास झाला आहे व ज्ञानाची प्रगती झाली आहे हे प्रत्यक्ष व्यवहारात दाखवणे कठीण आहे हे सांगून फुको म्हणतो की, अनुभवसिद्ध गोष्टीच आपण प्रत्यक्ष व्यवहारात अनुभवतो व दाखवू शकतो.

सत्ताकांक्षा-पॉवर-ही कल्पना फुकोने आपल्या विश्लेषणाच्या केंद्रभागी ठेवली आहे. सा-या मानवी समाजाचे व व्यक्तींचे विश्लेषण सत्ता ही संकल्पना केंद्रभागी ठेऊन फुकोने केले आहे. त्याच्या मते आज सारा समाजच मानसिक रूग्ण बनला आहे. सा-या समाजाला एका मानसिक रोगाने पछाडले आहे; सत्तेच्या महत्त्वाकांक्षेने मानवी समाज पछाडला आहे; हा एक मानसिक रोगच आहे, असे फुकोचे विश्लेषण आहे.

चोम्स्कीच्या मनवादाकडे-मेंटॅलिझमकडे-फुको आपल्या वैशिष्ट्यपूर्ण दृष्टीने पाहतो. चोम्स्की-फुको चर्चेत कोण अधिक बरोबर असा प्रश्न उपस्थित करणे योग्य होणार नाही. दोन मोठ्या विद्वानातली महत्त्वाच्या प्रश्नावरील ही चर्चा होती याच दृष्टीने त्या चर्चेकडे पाहणे योग्य होईल. चोम्स्की हा वर्तणूक वादाकडून सर्व समाजशास्त्रे व मानव्यविद्याशाखांचा अभ्यास मनवादाकडे वळणारा १९६० नंतरचा मोठा विद्वान आहे; तर फुको हा विसाव्या शतकाच्या अखेरच्या दोन दशकांवर प्रभाव टाकणारा व विशेषता स्त्रीमुक्तिवाद, नव इतिहासवाद व उत्तरसंरचनावाद या तीन विचारप्रणालींवर प्रभाव टाकणारा विचारवंत आहे हे लक्षात घेतले की, या चर्चेचे महत्त्व समजते. वर वर पाहिले तर फुकोची भूमिका मानवतावादाविरुद्ध आहे असे वाटते; पण नीट पाहिल्यास त्याची भूमिका अखेरीस मानवतावादीच आहे असे आढळते. फुकोचे विश्लेषण जरी कठोर व तर्ककर्कश वाटले, तरी ते मानवाविषयीच्या फार उमाळ्याने केलेले अगदी वेगळ्या स्वरूपाचे विश्लेषण आहे असे दिसेल.

मानवी मनातल्या योजना, प्रत्यक्ष जीवनात तळातली, दडून असलेली म्हणजेच अंतर्गत स्वरूपात असलेली (पृष्ठभागावर प्रगट न होणारी) संघटनातत्त्वे सा-या समाजाला मार्गदर्शन करीत असतात; सर्व समाजाचे बौद्धिक जीवनच ती तत्त्वे घडवीत असतात; माणसाचे वर्तन घडवायला ती कारणीभूत ठरतात अशी चोम्स्कीची भूमिका होती व आहे. मानवी जीवनाचे सत्त्व मानवी मनच घडवत असते; आजच्या औद्योगिक समाजरचनेमधले आर्थिक जीवन, व्यवहार, व्यापार लोकशाही समाज रचनेच्या संदर्भात घडला पाहिजे; हुकूमशाही राज्यव्यवस्थेला या समाजरचनेत वाव नसावा; तरच विषमतेवर नियंत्रण शक्य आहे, ही चोम्स्कीची भूमिका तर्कसुसंगत व नेमक्या स्वरूपाची आहे.

मानवी भाषा हे फार मोठे साधन आपल्याला उपलब्ध असून त्याच्या आधारेच आपण मनातल्या गोष्टींची अभिव्यक्ती करीत असतो. ही मानवी भाषा एक जैविक देणगी आहे, एक प्राणी म्हणून निसर्गाने माणसाला ती देणगी दिलेली आहे. माणसात एक भाषिक प्रेरणा (लँग्वेज इंस्टिन्क्ट) असते; मानवी भाषेचे एक वैश्विक व्याकरणच असते व परग्रहावरचा कोणी प्राणी इथे पृथ्वीवर आला तर त्याला वाटेल की, सर्व माणसांची भाषा एकच आहे. (जरी प्रत्येक भाषा दुस-या मानवी भाषेपेक्षा वेगळी आहे असा आपला अनुभव असला तरीही) त्याचे कारण म्हणजे निसर्गाने भाषेचे इंद्रियच सर्व माणसांना दिलेले असते, असे चोम्स्की म्हणतो. त्यामुळे मानवी भाषात आपल्याला सहज न दिसणारी समानता आहे; चोम्स्कीचा हाच मनवाद (मेंटॅलिझम) आहे.

(३)

लेखाच्या या तिस-या भागात आपण चोम्स्कीचा स्वतःच्या भाषाशास्त्रीय भूमिकेसंबंधीचा लेख (तो त्याच्या व्याख्यानावर आधारलेला होता) व त्याने दिलेल्या १-२ मुलाखती लक्षात घेऊ. मग चोम्स्कीची भूमिका त्याच्याच शब्दात मांडली गेली असे होईल. चोम्स्कीचा हा लेख अलिकडचा म्हणजे १९९८ मधला आहे. म्हणजे चोम्स्कीने एक क्रियाशील भाषाशास्त्रज्ञ म्हणून आपली कारकिर्द संपवल्यानंतरचा हा लेख (व व्याख्यान) आहे. त्यात अभिनिवेश नाही. भाषाशास्त्रज्ञ म्हणून असलेल्या आपल्या कारकिर्दीचे सिंहावलोकन त्यात आहे.

या लेखात वर्तनवादावर त्याने केलेली टीका सौम्य आहे, आपला मनवाद (मेंटॅलिझम) त्याने या व्याख्यानात नीट मांडला आहे. त्याने मांडले आहे की, सर्व प्राणीजगात मानवी भाषा वैशिष्ट्यपूर्ण आहे. भाषा हे मानवी संचित फार वेगळे आहे. प्राणी वापरत असलेली खुणांची भाषा (साईन लँग्वेज), त्यांची संदेशवहन पद्धती व विविध प्रकारचे आवाज काढण्याची काही प्राण्यांची शक्ती या सर्वापेक्षा मानवी भाषा वेगळीच आहे. प्राणी फक्त निश्चित स्वरूपाच्या, ठराविक संख्येने असलेल्या म्हणजेच संख्येने मोजक्याच असलेल्या खुणा, आवाज, ओरडणे या गोष्टी करू शकतात. आपल्या काही मोजक्याच भावना प्राणी व्यक्त करू शकतात. माणूस मात्र आपले विचार अमर्याद प्रकारे शब्दातून अभिव्यक्त करू शकतो.

मानवी भाषा प्राण्यांच्या भाषेतून उत्क्रांत झाली असेल या उत्क्रांतवादी सिद्धान्तावर त्याचा विश्वास नाही. कार्ल पौपर या विज्ञानाचे तत्त्वज्ञान मांडणा-या सुप्रसिद्ध विचारवंताच्या तसेच डब्ल्यू. एच. थौर्प या पक्षीशास्त्रज्ञाच्या (एथ्नोलॉजिस्ट) उत्क्रांतवादी मताशी तो सहमत नाही. [थौर्पने प्राण्यांची भाषा व मानवी भाषा यातले तीन समान मुद्दे - हेतूपूर्णता (परपझिवनेस), रचनात्मकता (सिंटॅक्टिक्नेस) व प्रोपोझिशननेस - दाखवले होते.] चोम्स्कीला उत्क्रांतीवादी मतच मान्य नव्हते, त्यामुळे हे थोर्पचे मत त्याला मान्य नव्हते.

मानवी भाषा यादृच्छ (ऑर्बिट्ररी), अमूर्त (ॲबस्ट्रॅक्ट) आहे; त्यातील चिन्हांची संख्या अमर्याद आहे; ती संख्या निश्चित नाही किंवा नक्की ठरलेली नाही; मानवी भाषा सतत माहिती देत असते व भाषाक्षमता (कॉम्पिटंस) ही गोष्ट भाषावापरापेक्षा (परफॉर्मन्स) भाषाशास्त्रात अधिक महत्त्वाची आहे, ही चोम्स्कीची भूमिका आहे. भाषाक्षमतेवर अधिक भर देणारा वर्तनवादी सिद्धान्त चोम्स्की मान्य करू शकत नाही.

लेवी-स्ट्रोस या मानववंशशास्त्रज्ञाच्या रचनावादी विचाराशीही चोम्स्की सहमत नाही (प्रत्येक समाजाची अशी एक रचना असते व त्या रचनेच्या संदर्भातच त्या त्या समाजाचे मूल्यमापन केले पाहिजे अशी लेवी-स्ट्रोसची भूमिका होती.) याकोबसन या संरचनावादी विचारांच्या ध्वनिशास्त्रज्ञा (फोनालॉजिस्ट) बरोबरही तो सहमत होऊ शकत नाही. त्याला लेवी-स्ट्रोस व याकोबसन या दोघांचेही विचार सांस्कृतिक व सामाजिक व्यवस्था नीट स्पष्ट करणारे आहेत, असे वाटत नाही. भाषा उपयोगाचा विचार केल्यास भाषेच्या तळच्या (डीपर लेवल) पातळीवर एक प्रकारची वैश्विकता असते. (म्हणजे सर्व मानवी भाषात काही भाग समान असतो); तर पृष्ठभागावर त्या विशिष्ट भाषेची भाषिक वैशिष्ट्ये आढळतात, असे चोम्स्कीला वाटते. भाषेच्या खोल तळावरच्या ज्या रचना असतात त्यांचा शोध घेणे हे आज मोठे आव्हान आहे व भविष्यातही ते आव्हान राहणार आहे अशी चोम्स्कीची धारणा आहे. चोम्स्कीचे जनरेटिव किंवा टी. जी. ग्रामर खोल पातळीवर अस्तित्वात असलेले भाषेचे सर्वसामान्य नियम व भाषिक व्यवस्था शोधते व सर्व मानवी भाषांना लागू पडणा-या वैश्विक नियमांचा शोध घेते.

चोम्स्कीला मानसशास्त्रातल्या नव्या घडामोडी, नवे शोध (विशेषतः प्रयोग करून सिद्ध झालेले शोध) माहीत होते. त्याला जो पिआजे हा मानसशास्त्रज्ञ व त्याने रुळवलेली वाट माहीत होती, तसेच चार्ल्स सँडर्स, पीअर्स व इतरांनी मानसशास्त्रात काय नवे केले, ते पण नीट माहीत होते. तसेच माणसाच्या मज्जासंस्थेशी (न्यूरल सिस्टम) संबंधित नवे कोणते शोध लागत होते हे त्याला माहीत होते. माणसां-माणसांमधला फरक हा काही अंशी जनुकीय (जेनेटिक) व आनुवंशिक (हेरेडिटरी) कारणांमुळे घडत असतो (जसा तो वातावरण व परिस्थितीमुळे घडत असतो) हे त्याला शास्त्रीय ज्ञानाच्या

आधारे माहीत होते. माणूस व इतर प्राणी यांच्यात बरीच जनुके (जीन्स) सारखी किंवा समान असली, तरी त्यांच्या घडणीतच काही महत्त्वाचे फरक असतात, असे त्याचे मत पक्के झाले होते. माणसाच्या मनात अनेक भावना व विचार असतात, त्यांचा अनुभवांशी फार संबंध नसतो; ते विचार व त्या भावना अनुभवपूर्व (अ प्रायोराय) असतात, असे तो मानत होता.

माणूस मुळात आक्रमक असतो व तो मुळातला सॅवेज किंवा रानटी पशू आहे, हे काही प्राणिशास्त्रज्ञांचे म्हणणे त्याला मान्य नाही. संस्कृतीला तो महत्त्व देतो. माणसाचे सांस्कृतिक उत्थान व सांस्कृतिक उन्नयन होते हे तो मानीत होता. वैश्विक व्याकरण निर्माण करण्याच्या प्रयत्नात चोम्स्की एक तत्त्वज्ञानधिष्ठित व्याकरण निर्माण करू पाहत होता असे दिसते. माणूस ज्ञान कसे प्राप्त करतो. ते ज्ञान प्राप्त करण्यात मानवी मन कोणती भूमिका बजावत असते, हे त्याचा मनवाद शोधत असावा असे वाटते. आजुबाजूला सर्वत्र जेव्हा शास्त्राधारित व वास्तववाधारित स्पष्टीकरणे देणे चालू होते, तेव्हा चोम्स्की मनवादाचा पुरस्कार करीत होता, हे लक्षणीय आहे. ज्ञानप्राप्तीत मनाची भूमिका महत्त्वाची आहे, हे त्याचे म्हणणे महत्त्वाचे आहे. भविष्यात मानसशास्त्रातही मनवादी भाषाविज्ञान महत्त्वाचे स्थान मिळवील याबद्दल त्याला कोठलीही शंका नव्हती.

(४)

चोम्स्कीचा लेख विचारात घेतल्यानंतर आपण त्याने दिलेल्या १-२ महत्त्वाच्या मुलाखतींचा विचार करू. चोम्स्कीवरचा जॉन सर्ल या भाषाशास्त्रज्ञाचा लेख, चोम्स्की-फुको चर्चा, त्याचा आपल्या भाषाविषयक मतांसंबंधीचा त्यांच्याच व्याख्यानावर आधारलेला लेख व या मुलाखती यांमुळे चोम्स्कीची भूमिका व त्याचे भाषाभ्यासातील स्थान स्पष्ट होईल.

चोम्स्कीने आपल्या दीर्घायुष्यात अनेक मुलाखती दिल्या आहेत. ब-याच मुलाखती त्याने एक महत्त्वाचा, मानवी समाजाची काळजी करणारा विचारवंत (पब्लिक इंटलेक्च्युअल) म्हणून दिल्या असल्या, तरी काही मुलाखती एक आघाडीचा भाषाशास्त्रज्ञ म्हणूनही दिल्या आहेत.

त्यातल्या इथे निवडलेल्या एका मुलाखतीत (ही मुलाखत त्याने बी. बी. सी. या चॅनलला दिली होती. त्या मुलाखतीची तारीख नोंदवलेली नाही.) त्याने काही लक्षणीय मुद्दे मांडले होते.-

१) एक भाषाशास्त्रज्ञ म्हणून व्याकरणाचे नियम स्पष्टपणे व नीटपणे मांडून व्याकरणाच्या अभ्यासाला व भाषाशास्त्र अभ्यासाला चोम्स्कीला वेगळे वळण, वेगळी दिशा द्यायची होती; भाषेकडे पाहण्याचा नवा दृष्टिकोन तो विकसित करू पाहत होता. सर्वसामान्य माणसे वापरत असलेल्या भाषेचे रूप तो स्पष्ट करू पाहत होता. भाषेच्या रचनेला एक अंतर्गत स्वरूप असते, एक आंगचे रूप असते, असे त्याचे म्हणणे होते.

२) मर्यादित साधने असताना मानवी भाषा अमर्याद व जटील वाक्ये घडवत असतात या वस्तुस्थितीचे स्पष्टीकरण देणे आवश्यक होते व हे १९५० नंतरच्या सांख्यिकी व कंप्युटर क्रांतिनंतर शक्य झाले, असे चोम्स्की म्हणतो.

३) भाषाव्यवस्था इतर जीवशास्त्रीय व्यवस्थांप्रमाणेच असून ती जनुके किंवा जीन्स व त्यात होणारे बदल लक्षात घेत असते. बाह्य परिस्थितीशी तिची क्रिया-प्रतिक्रिया होऊनच तिची घडण होत असते, असेही तो म्हणतो.

४) ध्वनी, हावभाव, शब्दार्थ व वाक्यार्थ ह्यांचे मूळ जरी माणसाच्या शरीरात असले, तरी त्यांचे दृश्य किंवा व्यक्त होणारे रूप मात्र माणूसच घडवीत असतो व अखेरीस केलेली उच्चाराची निवड त्याची असते. भाषेचा वापर माणूसच करीत असतो.

५) रचनात्मक भाषाशास्त्राने वापरलेली संशोधन साधने - डिस्कव्हरी प्रोसिजर्स - चोम्स्कीही त्याच्या मनवादी भाषाशास्त्रात वापरत होता. रचनावादी भाषा-शास्त्रज्ञांप्रमाणेच तो भाषेचे नमुने गोळा करीत होता. त्या नमुन्यांचे विश्लेषण करीत होता. त्याच वेळी तो असे मांडत होता की, भाषा ही मानवी देणगी आहे, भाषेचे इंद्रियच माणसाच्या मेंदूत असते, असे त्याचे म्हणणे होते. भाषा जटील स्वरूपाची असते, ती एक मानवी निवड व मानव रचित आहे, असे त्याचे मत आहे. मानवी भाषा हे अनेक पिढ्यांचे मानवी संचित

असून मानवी हावभाव या मानवी आविष्कारांपुढची भाषिक आविष्कार ही पुढली पायरी आहे असे तो स्पष्टपणे म्हणतो. भाषेचा माणसाने केलेला उपयोग ही प्रगत पायरी असून भाषा चिन्हस्वरूपाची आहे म्हणजे तिला माणसाने अर्थ दिलेला असतो व तिचा इतर चिन्हांप्रमाणे अर्थ लावावा लागतो, हे त्याचे मत आधुनिक भाषाशास्त्रातील मान्यतांना धरून आहे. भाषेच्या वैश्विक स्वरूपाचे चिन्हात्मकता हे एक वैशिष्ट्य आहे, असे चोम्स्की मानत होता.

३ जुलै १९९९ ला ब्रेन ॲंड लॅंग्वेज या कॅनडातल्या मासिकाने प्राग्मॅटिक्स या भाषाशास्त्राच्या शाखेवर (म्हणजे व्यवहारात किंवा प्रत्यक्षात भाषा कशी वापरली जाते, याचा अभ्यास करणारी भाषाशास्त्राची उपशाखा) एक विशेष अंक प्रसिद्ध केला होता. त्यासाठी चोम्स्कीकडे ई-मेलने त्या अंकाचा संपादक ब्रिजिट स्टेमर याने काही प्रश्न पाठवले होते व त्याला चोम्स्कीने ई-मेलने उत्तरे दिली होती. त्या मासिकाच्या ३९३ ते ४०१ या पानांवर ती प्रश्नोत्तरे प्रसिद्ध झाली आहेत.

चोम्स्कीने त्या लेखात आपले म्हणणे पुनः मांडले आहे. भाषाक्षमता ही परिस्थितीजन्य गोष्ट नसून एक जैविक देणगी आहे. माणसाची संदेशवहनक्षमता ही मानवी मेंदूतल्या जैविक इंद्रियक्षमतेवर ठरते, हे त्याने पुनः सांगितले. मनाची ही रचना (मनाचा एक आराखडा, रूपरेखा) पूर्वरचित, प्रत्यक्ष प्रमाणाने सिद्ध करता येणारी गोष्ट नाही, हे त्याला नीट माहीत आहे. मनाने ठरवलेला आराखडा किंवा रूपरेखा ही तर्काधारित गोष्ट आहे; असे तो प्रांजळपणे सांगतो हे लक्षात घ्यायला हवे.

एखाद्या इमारतीचा आराखडा ती बनवण्यापूर्वी जसा तयार केला जातो, तसेच या मनाने ठरवलेल्या आराखड्याबाबतीत असते. मेंदूत मज्जातंतूचे जाळे निर्माण झालेले असते; त्यातले विशिष्ट जाळे (सर्किट) विशिष्ट कार्य पार पाडीत असते. (उदाहरणार्थ, सांख्यिकी आकडेमोड संबंधित मज्जातंतूंचे एक जाळे असते, असा तर्कही चोम्स्कीने केला आहे.) भाषा क्षमतेशी निगडीत असेच एक मज्जातंतूचे जाळे असते हा चोम्स्कीचा तर्क गॅलिस्टेल या मानसशास्त्रज्ञाच्या म्हणण्यावर व त्याने केलेल्या प्रयोगावर आधारलेला होता. चोम्स्कीला ही जाणीव मात्र होती की, त्याच्या या तर्काला सामाजिक-आर्थिक-राजकीय बाजू आहे व तो तर्क हेतूशीही संबंधित आहे. पण त्याच वेळी आपण फक्त आकारिक, रचनासंबंधी भागाचा विचार करीत आहोत; सामाजिक-आर्थिक-राजकीय-हेतूसंबंधित बाजूंचा विचार करीत नाही याबद्दल त्याला खात्री होती (त्याचे प्रत्यक्षातले वर्तन पण तसेच राहिले आहे). भाषाभ्यास वर्तनवादाशी जोडला जाऊ नये, ही त्याची तळमळच होती व आहे. भाषा ही मानवी घटना इनपुट-आऊटपुट चक्राशी जोडली जाऊ नये, असा प्रयत्न त्याने सतत केला आहे.

भाषेचे केंद्र किंवा इंद्रिय मानवी मेंदूत असते, हे प्रयोगाने सिद्ध करता येणार नाही. कारण तसा प्रयोगच करता येणार नाही हे चोम्स्कीला माहीत आहे. भाषेला जवळ जाणारी मज्जाव्यवस्था प्रगत अवस्थेतल्या इतर सस्तन प्राण्यात असते का, असा प्रयोग सस्तन प्राण्यांवरही करणे कठीण आहे, हे त्याला नीट माहीत आहे. आपला सिद्धान्त तर्काधारितच असणार आहे; तो जीवशास्त्राशी संबंधित असला, तरी त्याचे स्वरूप प्रयोगाधारित आहे असा दावा करता येणार नाही ही समज त्याला आहे.

(५)

चोम्स्कीने भाषाशास्त्रात मूलभूत परिवर्तन घडवणारे पुस्तक - आस्पेक्ट्स ऑफ सिंटॅक्स - लिहिले. भाषाशास्त्रीय नियम, शब्द व ध्वनिसंबंधीचे नियम व वाक्यरूपांतराचे नियम - म्हणजे वाक्यातील तळाच्या भागाचे (डीप स्ट्रक्चरचे) पृष्ठभागी असलेल्या भागामध्ये (सरफेस स्ट्रक्चर) कसे रूपांतर घडते किंवा घडवले जाते, हे ते पुस्तक विस्ताराने व नीट दाखवते.

चोम्स्कीच्या सिद्धान्ताच्या मूलभूत किंवा पायाभूत भागाचे (बेस कंपोनंटचे) दोन भाग होतात. शब्दांची संगतवार रचना (म्हणजे सीक्वेंस ऑफ वर्ड्स) आणि भाषानियम पुनः लिहिणे व भाषेतल्या शब्दसाठ्यासंबंधी विचार करणे, असे त्या सिद्धान्ताचे दोन भाग होतात. जनरेटिव भाषाशास्त्र व जनरेटिव व्याकरण हे दोन विषय त्याने आपले हे दुहेरी उद्दिष्ट समोर ठेऊन त्या पुस्तकात नीट मांडले आहेत.

चोम्स्कीच्या मते भाषा ही जीवशास्त्रीय देणगीच आहे, मनुष्यजातीकडे ती वारसा म्हणून (जेनेटिकली)

आली आहे, पिढ्यान्-पिढ्यांचा जीवशास्त्रीय वारसा म्हणून ती आजच्या माणसाकडे आली आहे. मानवाचे लहान मूल भाषा शिकण्यापूर्वी भाषाशास्त्र व व्याकरणे शिकत नसते तर आपल्याला मानवी वारसा म्हणून मिळालेले भाषाशास्त्रीय नियम आजूबाजूच्या वातावरणाला, परिस्थितीला लावून ते मूल भाषाज्ञान मिळवत असते, वाक्ये घडवत असते, वाक्यांचा अर्थ ते स्वतः समजून घेते व इतरांपर्यंत पोचवते. त्याचे हे सर्जनशील काम आहे.

वाक्याच्या मूळ रचनेचे - बेसिक कंपोनंटचे - व वाक्याच्या दडलेल्या भागाचे - डीप स्ट्रक्चर्सचे - पृष्ठभागावर असणा-या भागामध्ये - सरफेस स्ट्रक्चरमध्ये - रूपांतर करीत असताना आपण कल्पक बनतो, सर्जनशील बनतो व नव्याच रचना घडवतो. हे आपले निर्मितीकार्य असते. आपल्याला मनुष्यजातीचा घटक म्हणून ही शक्ती मिळालेली असते. ही गोष्ट वैश्विक व्याकरणाशी (युनिव्हर्सल ग्रामरशी) संबंधित असते. (डीप स्ट्रक्चर ऐवजी चोम्स्की कधी कधी इनिशिअल फ्रेज मार्कर हा शब्दप्रयोगही वापरतो.) वाक्यांचे पृष्ठभागावर दिसणारे रूप - म्हणजे सरफेस स्ट्रक्चर - केवळ रचनेशी व व्याकरणाशी संबंधित असते हा समज गैरसमज असून वाक्याचा अर्थ पृष्ठभागी दिसणा-या रचनेशी - सरफेस स्ट्रक्चरशी - पण संबंधित असतो असे चोम्स्कीचे मत आहे. अर्थविज्ञानाला (सेमँटिक्सला) चोम्स्की कधीही तळाखालच्या रचनेला - डीप स्ट्रक्चरला - समानार्थी असलेला शब्द असे मानत नाही, हे लक्षात घेण्यासारखे आहे. ध्वनिशास्त्र किंवा फोनोलॉजीही तितकीच महत्त्वाची (म्हणजे डीपच!) आहे असे तो म्हणतो. अर्थ व ध्वनी हे दोन्ही वाक्यघटक समान महत्त्वाचे असून वेगवेगळ्या नियमांनी ते एकत्र येतात व अर्थवहन होते असे त्याचे म्हणणे आहे. (भाषा जरी ज्ञानक्षेत्राशी संबंधित असलेली गोष्ट असली, तरी भाषाशास्त्राचा वेगळा विचार करणे शक्य आहे. भाषाशास्त्राचे नियम कालोघात बदलतात, त्यांना आव्हानही दिले जाते म्हणजे ते त्रिकालबाधित सत्य नसतात या अर्थाने ते शास्त्रीय आहेत, असे चोम्स्की मानतो. शास्त्रीय नियमांविषयी असलेले हे त्याचे म्हणणे नीट लक्षात घेतले पाहिजे.)

आजचे व्याकरण सर्जनशील - जनरेटिव - असून आजचे भाषाशास्त्रही सर्जनशील - जनरेटिव - आहे असे चोम्स्कीचे मत आहे. आजच्या भाषाशास्त्रात आपल्याला तयार उत्तरे, तयार अभ्यासपद्धती, तयार सोल्युशन्स मिळत नाहीत. त्या सगळ्यांचा शोध घ्यावा लागतो. ती शोधावी लागतात, ती निर्माण करावी लागतात. आपल्याला जे निसर्गाकडून व पूर्वजांकडून, पूर्वसूरींकडून मिळालेले असते ते पुरेसे नसते; वारसा म्हणून मिळालेले सर्व खरे असते असेही नसते, ते मर्यादित व अपुरेही असू शकते. म्हणूनच नवी उत्तरे, नवी सोल्यूशन्स शोधावी लागतात. नवे शोध लावावे लागतात. नवे शोध, माणसाची नवे जाणून घेण्याची इच्छा, त्याचे प्रयत्न, निवडलेल्या क्षेत्रातले अधिक समजून घेण्याची त्याची इच्छा याच्याशी मानवी आयुष्य निगडीत असते.

भाषा व सर्वसामान्य बौद्धिकता (कॉमन सेन्स) ह्या माणसाच्या जन्मदत्त देणग्या आहेत, असे चोम्स्कीचे मत आहे, हे आपण पाहिले आहे. या दोन्ही देणग्या नेणीवेतल्या देणग्या या सदरात मोडतात. आपण जे जाणीवपूर्वक आत्मसात करतो, शिकतो आजूबाजूच्या वातावरणातून आपण जे मिळवतो ते जाणीवेशी निगडीत आहे, असे चोम्स्की मानतो. आपले भाषिक आविष्कार विविध प्रकारे होत असतात. आपल्याला जे अर्थवहन करायचे असते, त्यासाठी आपण ध्वनियोजना व वाक्यरचना करीत असतो. आपले हे आविष्कार अनंत, अगणित असतात. त्यांना व्याकरणाची तत्त्वे व नियम लागू होतात. व्याकरण केवळ त्या विशिष्ट भाषेपुरते मर्यादित नसते, तर ते वैश्विक स्वरूपाचे असते. म्हणजे मनुष्यजातीचा जैविक वारसा म्हणून आपल्या सर्वांनाच व्याकरण मिळालेले असते, चोम्स्की त्याला (युनिव्हर्सल ग्रामर) वैश्विक व्याकरण हे नाव देतो.

व्याकरण एक व्यवस्था (सिस्टिम) आहे. त्याला नियम व तत्त्वे असतात. सर्वच मानवी भाषा व्याकरणाचे नियम व तत्त्वे पाळत असतात. ते नियम व ती तत्त्वे विशिष्ट भाषेप्रमाणे बदलत असली, तरी व्याकरणातील मूलभूत नियम व तत्त्वे सर्व मानवी भाषांना समानपणे लागू पडतात. चोम्स्कीला खात्रीने वाटते की, भाषा हे मानवी जीवनाचे जैविक संचित, जैविक वारसा आहे.



अनुक्रमणिका

(वर्तनवादापेक्षा हे फार वेगळे मत आहे, हे स्पष्ट आहे.) माणूस जेव्हा वातावरणाशी जुळवून घेत होता, तेव्हा भाषेची उत्पत्ती झाली असावी असेच चोम्स्की मानतो. माणसाने त्यावेळेला ज्ञानाच्या ज्या अनेक व्यवस्था तयार केल्या, त्यातीलच भाषा ही एक व्यवस्था असावी. ती ब-याच प्रमाणात जैविक आहे, आजूबाजूच्या वातावरणातून, परिस्थितीतून, आदल्या पिढीकडूनही माणूस भाषाज्ञान घेत असतो. चोम्स्की गॅलिस्टेल या शास्त्रज्ञाचे मत मान्य करतो की, भाषेशी संबंधित असा माणसाच्या मेंदूत एक स्वतंत्र भागच असतो व तो भागच माणूस वापरत असलेल्या भाषेचे नियंत्रण करीत असतो.

भाषेतील वाक्यरचना किंवा सिंटॅक्स ही अखेरीस एक मानवी रूढीच आहे. तिचे स्वरूप व महत्त्व चोम्स्कीने आपल्या मनकेंद्री भाषाविचाराने व अनेक उदाहरणे देऊन, गणिती साधने व नव्या युगातल्या कंप्युटरसारख्या साधनांचा वापर करून स्पष्ट केले आहे. भाषा हे माणसाचे अस्तित्व सिद्ध करणारे महत्त्वाचे साधन आहे हे त्याला कळले आहे. तीच भाषा माणसाच्या ज्ञानाची, माहितीची मर्यादाही आहे हे भान चोम्स्कीला आहे. (म्हणजे माणसाचा विचार भाषेच्या चौकटीतच होत असतो हे सत्य त्याला मान्य आहे.) माणसाचे ज्ञानग्रहण भाषेद्वारे होते. भोषेचे मूळच मानवी मनात आहे. मानवी मनाने भाषावापराच्या ज्या मर्यादा निर्माण केल्या असतील त्या मर्यादातच आपला ज्ञानव्यवहार चालतो याची नीट समज चोम्स्कीला आहे.

सर्वच क्षेत्रात वर्तनवाद प्रभावी ठरत असतानाच्या कालखंडात चोम्स्कीने मनवादाची (मेंटॅलिझमची) बाजू घेऊन गणिती व सहज नाकारता न येणारा सिद्धान्त मांडणे हीच फार मोठी गोष्ट होती. भाषाशास्त्रात आजही चोम्स्कीचा सिद्धान्त वर्तनवादापेक्षा अधिक मोठ्या प्रमाणात स्वीकारला जातो; वर्तनवादी भाषाशास्त्र तितके स्वीकारले जात नाही. गेल्या ४ एक दशकांत जगभरातले, विविध भाषांतले हजारो भाषाशास्त्रज्ञ चोम्स्कीच्या सिद्धान्ताला अनुसरून काम करतात, त्याने जमा केलेले पुरावे व माहिती वापरतात. यातूनच त्याच्या कामाचे मोल किती मोठे आहे, हे स्पष्ट होते. माणसाच्या विकासात, घडणीत जन्मदत गोष्टींचा भाग किती व आजूबाजूच्या परिस्थितीचा भाग किती हे शास्त्रकाट्यावर आजही सिद्ध झाले नसले, तरी मनवादाची बाजू भक्कमपणे मांडणा-या चोम्स्कीचे कार्य महत्त्वाचे आहे, हे आज सर्वच मान्य करतात. जग जाणण्याच्या वर्तनवाद व मनवाद (मेंटॅलिझम) या खिडक्या आहेत, हे दोन दृष्टिकोन आहेत. माणसाची समज अधिक बळकट करण्यासाठी दोनही दृष्टिकोनांचे अस्तित्व आवश्यक आहे. या दोन पैकी एकच दृष्टिकोन खरा असे मानण्याच्या अवस्थेला माणसाचे ज्ञान व समज अजून तरी पोचलेली नाही.

**संदर्भ :-**

१) Noam Chomsky on Language. The New Press, New York. 1977. चोम्स्कीची आधी प्रकाशित झालेली दोन पुस्तके एकत्र रूपात न्यूयॉर्कच्या न्यू प्रेसने १९७७ मध्ये या नावाने प्रकाशित केली आहेत.

२) बी. एफ. स्किनरचे बिहेविअरिझमवरचे पुस्तक जरी १९५७ मध्ये प्रकाशित झाले असले, तरी त्याचे वर्तनवादावरचे - बिहेविअरिझमवरचे - शोधनिबंध व त्यावरील भाषणे त्या आधी १० वर्षांपूर्वीपासूनच अभ्यासकांना माहिती होती. वर्तनवाद म्हणजे काय हे अभ्यासकांना १९५७ पूर्वीच माहित होते.

३) चोम्स्कीने १९७५ मध्ये मॅक मास्टर्स या फ्रान्स मधल्या विद्यापीठात फ्रेंच भाषेतच व्याख्याने दिली होती. ती नंतर इंग्लिशमध्ये रिफ्लेक्शन्स ऑन लँग्वेज म्हणून प्रसिद्ध झाली.

४) The Essential Chomsky. (ed.) Anthony Arnov. New York and London : New Press, 2008.

५) चोम्स्कीने स्किनरच्या बिहेविअरिझम या पुस्तकावर ३३ पानी मोठा रिव्ह्यू लिहिला. Language vol. 35 Jan-March 1959, pp. 26-58. या भाषाशास्त्रविषयक मासिकात तो प्रसिद्ध झाला.

६) Steven Pinker. The Language Instinct; How the Mind Creates Language. New York : Perenial Classics, 2000.

७) John Searl, 'Chomsky's Revolution in Linguistics' New York review of Books, 29th January 1972.

८) Chomsky, 'Linguistic Contribution to the






study of mind', Language and Mind. 1998.
९) Wiktor Osiatynski (ed), Contrasts : Soviet and American thinkers Discuss the future. Macmillan, 1984. pp. 95-101.
१०) ब्रेन एँड लँग्वेज Brain and Language या कॅनडातील मासिकाने एक खास अंक Pragmatic (प्राग्मॅटिक्स) या भाषाशास्त्राच्या उपशाखेवर काढला होता. त्यासाठी चोम्स्कीची मुलाखत Brigitte Stemmer (ब्रिजिट स्टेमर) या त्या मासिकाच्या संपादकाने घेतली होती. ती मासिकाच्या ३ जुलै १९९९ च्या अंकात पान ३९३-४०१ वर छापली आहे. प्रश्नोत्तर स्वरूपात ती मुलाखत आहे.

**टिप** : 'चोम्स्कीचा वैचारिक प्रवास' या लेखाचा पहिला भाग जुलै २०१६ मध्ये प्रकाशित झाला असून येथे दुसरा भाग प्रकाशित केला आहे.





अनुक्रमणिका








# महात्मा फुले कृत शिवचरित्र : एक आकलन

शिल्पा शेटे

महात्मा फुले यांनी शिवाजी महाराजांवर एक पोवाडा लिहिला आहे, हे सर्वविदित आहे. तसेच त्यांच्या अन्य लेखनातही छत्रपती शिवाजी महाराजांचे संदर्भ येत राहतात. महात्मा फुले यांचे शिवचरित्रविषयक जे 'आकलन' होते त्याचे आकलन करून घेणे, हे या लेखाचे उद्दिष्ट आहे.

महात्मा फुले यांनी मांडलेली तथ्ये बरोबर की, चूक हे इथे ठरवावयाचे नाही. तसे करणे कदाचित अन्यायकारक ठरेल. त्याचे एक कारण असे की ज्यास आपण रूढार्थाने इतिहासकार म्हणतो तसे, म. फुले काही इतिहासकार नव्हते. ते होते समाजक्रांतिकारक. एका सामाजिक नेत्याने शिवचरित्रावर केलेले भाष्य या दृष्टीनेच त्याकडे पहायला हवे. दुसरी गोष्ट म्हणजे त्या काळात या विषयाचे संशोधनही फार पुढे गेले नव्हते. संशोधक मंडळी त्यांच्या परीने साधने गोळा करीत होती. कित्येक महत्त्वाची साधने ही म. फुले यांच्या मृत्यूनंतर उजेडात आली. उदा., शिवभारत, जेधे शकावली इ.

कोणताही भाष्यकार हा त्या विशिष्ट काळाचा अपत्य असतो. कोणताही इतिहास अभ्यासक हा त्याच्या दृष्टिकोनातून तथ्यांची मांडणी करत असतो. त्याने केलेली तथ्यांची निवड, मांडणी, रचना, जोडलेला कार्यकारणभाव, काढलेले निष्कर्ष यातून त्याची विशिष्ट अशी दृष्टी प्रकट होत असते. म्हणूनच कोणत्याही दोन इतिहासकारांची भाष्ये ही समसमान नसतात. त्याच्यावर अटळपणे त्या इतिहासकाराच्या दृष्टीचा प्रभाव पडतो व त्यामुळे त्या त्या इतिहासकाराचा इतिहास काही प्रमाणात वेगळा असतो. जरी महात्मा फुले ॲकॅडमिक इतिहासकार नसले, तरी त्यांची स्वतःची अशी एक इतिहासदृष्टी होती. त्यांच्या या लेखनामागे त्यांच्या कोणत्या प्रेरणा, विचार, भावना, हेतू अथवा राजकारणे होती व त्यातून त्यांची कुठली इतिहासदृष्टी प्रकट होते याचाही शोध घेण्याचा प्रयत्न या लेखात केला आहे.

**शिवचरित्राची रूपरेषा —**

हा पोवाडाच असल्याने तो फार तपशीलवार असण्याची अपेक्षा करता येणार नाही. तरीही त्याने सुमारे ४० पाने व्यापली आहेत. शिवचरित्रातील महत्त्वाच्या घटनांचा आढावा यात घेण्यात आला आहे. हा पोवाडा आठ भागांत विभागलेला आहे. पहिल्या भागात शिवरायांचा जन्म आणि बालपण येते. दुस-या भागात जिजाऊंनी केलेले संस्कार, आर्य (ब्राह्मण) व क्षत्रिय यांचा संघर्ष तसेच मुस्लीम राज्यकर्त्यांचे अत्याचार व शिवरायांचे प्रारंभिक काळातील पराक्रम येतात. त्यानंतर अफजलखान प्रकरण, सिद्दी जौहर, शाहिस्तेखान, दिलेरखान-जयसिंग स्वारी, आग-याहून सुटका इ. तपशील सहाव्या भागापर्यंत पूर्ण होतात. त्यानंतर तानाजीचा पराक्रम, राज्याभिषेक, दक्षिण दिग्विजय, व्यंकोजीला उपदेश व शिवरायांचा मृत्यू इ. तपशील येतात. त्यानंतर शिवरायांचे सविस्तर गुणवर्णन येते. या भागात शिवाजी राजांचे मूल्यमापन असल्याने या भागाला पोवाड्याच्या गाभ्याचा भाग असे म्हणता येईल. सर्वात शेवटी एक अभंग त्यांनी रचला आहे. त्यात इंग्लडच्या राणीला त्यांनी शूद्रांना ब्राम्हणशाहीपासून मुक्त करण्याची विनंती केली आहे.

सर्वसाधारणपणे कोणत्याही इतिहासासंबंधी दोन वेगवेगळ्या अभ्यासकांनी दिलेले तपशील फार वेगळे नसतात. पण तरीही प्रत्येक अभ्यासकाने लावलेला अन्वयार्थ मात्र काही प्रमाणात वेगळा असतो. याचे कारण म्हणजे त्या अभ्यासकाचा दृष्टिकोन. तो जर आपल्याला समजून घ्यायचा असेल, तर त्या अभ्यासकाने तथ्यांची 'निवड' कशा प्रकारे केली आहे, हे प्रथम समजून घ्यावे लागते. कोणती तथ्ये त्या अभ्यासकाला किती महत्त्वाची वाटली व कोणती तथ्ये त्यास दुर्लक्षणीय वाटली हे समजून घेणे; त्याची इतिहासदृष्टी समजून घेण्याच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे. तसेच इतिहासाच्या कित्येक जागा अशा असतात की, तिथे अभ्यासकाला










'भूमिका' घ्यावी लागते. मुख्यतः अशा ठिकाणी त्या अभ्यासकाच्या दृष्टीचा उलगडा होतो. इतिहासात जो वादग्रस्त भाग असतो, तो बहुतांश वेळा हाच असतो. इतिहासातल्या अशा जागा वैचारिक क्षेत्रातील रणक्षेत्रे बनतात. इतिहासदृष्टी समजून घेताना अशा जागा नीट पहाव्या लागतात.

**ब्राह्मण – ब्राह्मणेतर संबंध**

म. फुले यांच्या इतिहास आकलनानुसार आर्य (पक्षी : ब्राम्हण) हे इराणमधून आलेले होते. इथल्या स्थानिक क्षत्रियांना त्यांनी हरवले होते. पुढे त्यांना स्वतःचे दास बनवले होते. पोवाड्याच्या अगोदर असलेल्या प्रस्तावनेत तसेच अभंगातही हा संघर्ष त्यांनी चितारला आहे. (पहा, म. फुले समग्र वाङ्मय, पृ. ४० ते ४२) हा आर्य-अनार्य संघर्ष पोवाड्यात नंतरही आला आहे. त्यांच्या मते परशुरामाने २१ वेळा अतिशय निर्घृणपणे पृथ्वी निःक्षत्रिय केली. (निःक्षत्रिय याचा अर्थ इथे तारतम्यानेच घ्यायचा आहे. कारण प्रत्यक्षात बरेचसे क्षत्रिय उरले व त्यांना शुद्रातिशूद्रांचे कनिष्ठ स्थान देऊन ठेवण्यात आले.) हा सर्व इतिहास त्यांनी जिजांऊच्या मुखातून वदवला आहे. अर्थात या सर्वांचे परिणाम काही चांगले झाले नाहीत. कारण यामुळे यवनांचे (पक्षी : मुस्लीम) फावले व त्या मुस्लीम राज्यकर्त्यांनी सर्वांना त्रास देण्यास सुरुवात केली. पोवाडा समाप्त झाल्यानंतर म. फुल्यांनी शेवटी एक अभंग दिलेला आहे. त्यात सुद्धा जिकडे-तिकडे ब्राह्मणशाही कशी माजलेली आहे व तिचा त्रास शुद्रातिशूद्रांना कसा होतो आहे, हे म. फुले इंग्लंडच्या राणीला सांगतात. इंग्रजांची जरी सत्ता असली, तरी ती त्यांच्या मते जागृत नव्हती. म. फुले या सत्तेला डोळे उघडून पाहण्याची व या दुष्ट भटशाहीपासून सोडविण्याची विनंती करतात. (पृ. ७२). म. फुले यांचे एकूण इतिहासाचे आकलन असे होते की, ब्राह्मण-ब्राह्मणेतर संघर्ष हा या भूमीतला अतिशय मूलगामी असा संघर्ष आहे. प्राचीन काळी आर्यांनी (ब्राह्मणांनी) हा देश जिंकला व इथल्या शुद्रातीशूद्रांवर दास्य लादले. ते आतापर्यंत तसेच आहे. तो प्राचीन काळाचा द्वेषच पुढे चालू राहिला. ब्राह्मणांनी आधी शस्त्राच्या बळावर तर नंतर लेखणीच्या बळावर शुद्रातिशूद्रांवर दास्य लादले.

**दादोजी कोंडदेव-रामदास-तुकाराम-गागाभट्ट**

वरील व्यक्तींचा शिवाजी महाराजांशी नेमका काय संबंध होता, हा इतिहासात एक भलताच वादग्रस्त प्रश्न बनून राहिला आहे. हे वाद अद्यापही पूर्णपणे मिटलेले नाहीत. विशेषतः यातल्या पहिल्या तीन व्यक्ती या शिवाजी महाराजांच्या गुरू होत्या किंवा नव्हत्या असे दोन्ही बाजूने हिरीरीने सांगितले जात असते. यातल्या एकेका व्यक्तीविषयी म. फुले यांनी काय भूमिका घेतली ती पाहू. दादोजी कोंडदेव हे शिवरायांचे गुरू असून त्यांनी बालपणी शिवरायांना शिक्षण दिले व त्याअर्थी ते शिवरायांचे गुरू आहेत, असे सांगितले जात असते. म. फुले यांना हे मान्य नाही. "मासा पाणी खेळे गुरू कोण असे त्याचा" असे ते म्हणतात. (पृ. ४८). शिवरायांच्या शिक्षणाचे श्रेय त्यांनी दादोजी कोंडदेवांना दिलेले नसले, तरी जाणिवपूर्वक शिवाजीराजांना अज्ञानी (अविद्वान) ठेवण्याचे (अप) श्रेय मात्र त्यांनी दिले आहे. (पृ. ५५९) पुढे १८८६ साली मामा परमानंद यांना लिहिलेल्या पत्रातही त्यांनी आजकालचे ब्राह्मण दादोजी कोंडदेवास फाजील महत्त्व देतात, असे मत व्यक्त केले आहे. (पृ. ४०६). शिवरायांची गुरू मानली गेलेली आणखी एक व्यक्ती म्हणजे समर्थ रामदास. फुले यांना रामदास हे शिवरायांचे गुरू होते, हे मान्य आहे. पण त्यावर त्यांचे म्हणणे असे की 'लोकप्रीतीकरिता करी गुरू रामदासास' (पृ. ५४). थोडक्यात म. फुल्यांच्या मते तो शिवरायांचा एक 'पवित्रा' आहे. फुले वाङ्मयात रामदासांविषयी बरेच उल्लेख येतात. त्याचा एकूण आशय असा की रामदास एक मतलबी व स्वजातिहितार्थ काम करणारे संत होते. शिवाजी राजे आणि संत तुकाराम यांच्यातील स्नेह रामदास आणि गागा भट्ट यांनी जाणीवपूर्वक वाढू दिला नाही, असे मत त्यांनी व्यक्त केले आहे. ते म्हणतात, "नंतर थोडा काळ लोटल्यावर तुकाराम या नावाचा साधू शेतक-यांमध्ये निर्माण झाला. तो शेतक-यांतील शिवाजीराजास बोध करून त्याच्या हातून भटब्राह्मणाच्या कृत्रिमी धर्माची उचलबांगडी करून शेतक-यास त्यांच्या पाशातून सोडवील, या भयास्तव भटब्राह्मणातील अट्टल वेदांती रामदासस्वामींनी महाधूर्त गागाभटाचे संगन्मताने अक्षरशून्य

शिवाजीचे कान फुंकण्याचे सट्टल ठरवून, अज्ञानी शिवाजीचा व निस्पृह तुकारामबुवांचा पुरता स्नेह वाढू दिला नाही." (पृ. २६६). या उदाहरणावरून शिवाजी-रामदास-तुकाराम यांच्या आपापसांतील संबंधा-विषयी त्यांची मते पुरेशी स्पष्ट होतात. असे दिसते की, ब्राह्मण संतांकडे म. फुले संशयाने पाहतात. रामदास त्यास अपवाद नाहीत. गागाभट्टांविषयी पोवाड्यात असे म्हटले आहे की,

"काशीकर गंगाभट घाली डौल धर्माचा।
केला खेळ गारूड्याचा।।
लुटारू शिवाजी लुटला धाक गृहफौजेचा।
खर्च नको दारू-गोळ्याचा।।"

(पृ. ६७). थोडक्यात गागाभट्टांनीही शिवाजीराजांच्या धर्मभावनेचा गैरफायदा घेत स्वतःचा स्वार्थ साधला, असे म. फुल्यांचे मत आहे. एकूण शिवकालात शिवाजी राजांसी संबंध आलेले बहुतांश ब्राह्मण 'मतलबी' होते, अशी म. फुले यांची धारणा दिसते.

**गो-ब्राह्मण-प्रतिपालन**

शिवचरित्रातले हे अजुन एक वादग्रस्त प्रकरण. शिवाजी महाराज गो-ब्राह्मण-प्रतिपालक होते काय, याविषयी भाष्यकारांनी परस्परविरोधी मते दिली आहेत. म. फुले यांच्या पोवाड्यातून या मुद्यांविषयी त्यांची भूमिका नीट स्पष्ट होत नाही. पण पोवाड्याची पहिलीच ओळ अशी आहे.

"लंगोट्यास देई जानवी पोशिंदा कुणब्याचा।"

बहुधा याचा अर्थ असा दिसतो की, शिवाजी नामक शेतकरी राजाने ब्राह्मणांची 'जानवी' राखली. म्हणजे ते गो-ब्राह्मण-प्रतिपालकच होते. फक्त फरक असा की, एरवी 'गो-ब्राह्मण-प्रतिपालक' शब्दात गाय नि ब्राह्मण यांना एक पावित्र्य असते, ते म. फुल्यांना अभिप्रेत नाही. इथे शिवाजी राजा त्राता तर ब्राह्मण त्यांचे आश्रित मात्र आहेत. पुढे 'गुलामगिरी' या ग्रंथात "शिवाजीसारख्या धर्मभोळ्या, अज्ञानी, शूद्र राजाने आपला देश म्लेंच्छांपासून सोडवून गायी-ब्राह्मणांचे कसे पालन केले याविषयी अनेक हुलथापा देऊन त्यांस पोकळ स्वधर्माभिमानी करून सोडितात....." (पृ. १५९). नंतर 'शेतक-याचा आसूड' मध्ये एक उल्लेख येतो की, ".....अशा बुद्धिमान मानवजातीपैकी शूद्र शिवाजी शेतक-याने एका देवास भजणा-या मुसलमानी बादशहास जरजर करून गायीब्राह्मणांसह त्यांच्या मतलबी धर्माचा प्रतिपाळ केला." (पृ. ३१६) एकूण असे दिसते की, या मुद्द्यावर फुले यांची भूमिका काहीशी अस्थिर आहे. म. फुले शिवाजी राजांना 'गो-ब्राह्मण प्रतिपालक' मानतात मात्र या मुद्यास फाजील महत्त्व देण्यास त्यांचा विरोध आहे. मामा परमानंदास लिहिलेल्या पत्रात अशा आशयाचा विचार त्यांनी व्यक्त केला आहे. (पृ. ४०६)

**हिंदू-मुस्लीम प्रश्न**

शिवकाळात हिंदू-मुस्लीम प्रश्नांचे स्वरूप काय होते, हा अजून एक वादग्रस्त विषय. म. फुले यांनी याबाबतीत आपली भूमिका सविस्तर मांडली आहे. मुस्लीम राज्यकर्त्यांनी भारतावर आक्रमण करून हिंदूंवर अत्याचार कले, असा त्यांचा निष्कर्ष आहे. पोवाड्यातल्या पुढील काही ओळी पहा.

"काबुला सोडी। नदांत उडी।।
ठेवितो दाडी। हिंदूस पीडी।।
बामना बोडी। इंद्रिये तोडी।।
पिंडीस फोडी। देऊळे पाडी।।
चित्रास तोडी। लेण्यास छेडी।।
गोमांसी गोडी। डुकरा सोडी।।
खेड्यास ताडी। जेजुरी गडी।।
भुंग्यास सोडी। खोडीस मोडी।।
मूर्तीस काढी। काबुला धाडी।।
झाडीस तोडी। लुटली खेडी।।
गडांस वेढी। लावली शिडी।।
हिंदूस झोडी। धर्मास खोडी।।
राज्यास बेडी। कातडी काढी।।
गर्दना मोडी। कैलासा धाडी।।
देऊळे फोडी। बांधीतो माडी।।
उडवी घोडी। कपाळा आढी।।
मिजास बडी। ताजीम खडी।।
बुरखा सोडी। पत्नीस पीडी।।
गायनी गोडी। थैलीते सोडी।।
माताबोध मनी ठसता राग आला यवनांचा।।
बेत मग केला लढण्याचा।।" (पृ. ४७-४८)

एकूण सारांश असा की, मुस्लीम राज्यकर्त्यांच्या

अत्याचारांमुळे शिवाजी राजांना मुस्लीम सत्तेविरोधी लढावे लागले. म. फुले यांच्या मते हा हिंदू-मुस्लीम संघर्ष असा आहे. तोरणा किल्ला जिंकल्यानंतर त्यावर फुले म्हणतात, "झेंडा रोवला हिंदूचा।" म्हणजे शिवरायांचे राज्य फुल्यांना हिंदुराज्य वाटते, असे दिसते.

**इस्लामविषयक भूमिका** :-

फुले यांनी लिहलेल्या पोवाड्यात तरी त्यांची इस्लाम धर्माविषयक भूमिका नीट स्पष्ट होत नाही. मात्र मुस्लीम आक्रमकांनी जे अत्याचार केले होते, ते मात्र त्यांच्या मते धार्मिक स्वरूपाचे होते. त्यात देवळे फोडणे, मुर्तिभंजन, गो-हत्या, चित्रे व लेण्यांचा विंध्वंस इ. गोष्टी येतात. एकूण हिंदू धर्म नष्ट करणे, असा त्याचा आशय आहे. हे अशाप्रकारे हिंदूधर्म नष्ट करणे हे अर्थातच वाईट आहे, असा पोवाड्यातला अभिप्राय आहे. मात्र पुढे ही भूमिका काही प्रमाणात बदलली आहे. हिंदू धर्म हा त्यांना पहिल्यापासूनच अतिशय दोषयुक्त वाटत असला, तरी पुढे तो त्यांना अगदीच असुधारणीय वाटू लागला होता. तुलनेने इस्लाम धर्म सार्वजनिक सत्यधर्माच्या जवळचा आणि उन्नत धर्म आहे, असे त्यांचे मत बनले. याचे मुख्य कारण असे की इस्लामी धर्मग्रंथ 'कुराण' सर्वांनाच वाचून पाहण्याची मुभा होती. तसेच मुस्लिमांमध्ये आपसात रोटी-बेटी व्यवहारालाही काहीच अडचण नव्हती व ते एकमेकांना भावंडाप्रमाणे मानतात, असे फुले यांचे मत बनले. (पृ. ४७०). परिणामी मुस्लीम राज्यकर्त्यांच्या धार्मिक अत्याचारांविषयीसुद्धा त्यांचे मत बदलेले दिसते. उदा., 'शेतक-यांचा आसूड' मध्ये ते एका ठिकाणी म्हणतात की "......हजरत महंमद पैगंबरचे जहामर्द शिष्य, आर्य भटांचे कृत्रिमी धर्मासहित सोरटी सोमनाथसारख्या मूर्तीचा तलवारीच्या प्रहारांनी विध्वंस करून, शूद्र शेतक-यांस आर्यांचे ब्रह्मकपटातून मुक्त करू लागल्यामुळे भट ब्राह्मणांतील मुकूंदराज व ज्ञानोबांनी......डावपेची ग्रंथ करून शेतक-यांची मने इतकी भ्रमिष्ठ केली की, ते कुराणासहित मंहमदी लोकांस नीच मानून त्यांचा उलट द्वेश करू लागले." (पृ. २६६). १८६९ साली लिहिलेल्या पोवाड्यात त्यांना मुस्लीम राज्यकर्ते हे धार्मिक अत्याचारी वाटत होते; ते नंतरच्या काळात शूद्रांना भटांच्या कृत्रिमी धर्मातून मुक्त करणारे वाटू लागले. एवढेच नाही तर, या मुस्लीम राज्यकर्त्यांना ईश्वरानेच त्यांना या कार्यासाठी पाठविले आहे, असेही त्यांचे मत बनले. 'सार्वजनिक सत्य धर्म' या पुस्तकात ते म्हणतात, "यास्तव सर्वन्यायी आपल्या सर्वांच्या निर्मिकाने शुद्रादि अतिशूद्रांबद्दल धूर्त आर्यभट्टांस प्रायश्चित देऊन त्यांस शुद्धीवर आणण्याकरीता पूर्वी मुसलमानांस व हल्ली ख्रिस्ती लोकांस आर्यांचे धनी केले आहेत......" (पृ. ४९१). आणखी एके ठिकाणी ते म्हणतात, "कृत्रिमी आर्य भूदेव नटांच्या आप मतलबी बनावट धर्माच्या पाशात सापडलेल्या बहुतेक अज्ञानी मूर्तीपुजकांचे कल्याण होण्यासाठी कित्येक धार्मिक जहामर्द मुसलमानांनी आपल्या हातावर शिरे घेऊन तलवारींच्या जोराने त्यांनी आपल्या सारख्या त्यांच्या सुन्ता करून त्यांस "बिसमिल्ला हिर रहिमान निर्रहिम" असा महापवित्र कलमा पढवितात व त्यांस आपल्या सर्वांच्या सरळ सत्यमार्गावर नेतात." (पृ. ४७०). त्यामुळे मुर्तिभंजन व जबरी धर्मातरे यांच्याकडे फुले आर्यांच्या मतलबी धर्मातून मुक्तता या दृष्टीने पाहू लागले. परिणामी शिवकाळातील हिंदू - मुस्लीम संघर्षाचे विषयी त्यांचे आकलन बदलून गेले. ते म्हणतात, ".......रामदास वगैरे ब्रह्मवृंदातील महाधूर्त सांधूनी दासबोध वगैरे अनेक प्रकारचे थोतांडी ग्रंथ रचून त्या सर्वांचे कपटजालात अक्षरशुन्य शिवाजीसारख्या महावीरास फसवून त्यास मुसलमान लोकांचे पाठलाग करावयास लाविले."(पृ. ४७१). म्हणजे त्यांच्या उत्तरकालीन मतांतही त्यावेळचा संघर्ष हा धार्मिक संघर्ष होता, हे मत वस्तुस्थिती म्हणून कायम आहे. मात्र हा मुस्लिमविरोधी संघर्ष करण्यात शिवाजीराजांची फसवणुक झाली आहे, असे त्यांना वाटते. त्याचे (अप) श्रेय ते रामदास वगैरे साधूंना देतात.

**स्त्री-विषयक भूमिका** :

शिवाजी महाराजांचे स्त्री दाक्षिण्य इतिहासात प्रसिद्ध आहे. युद्धात सापडलेल्या स्त्रियांना सन्मानपूर्वक शिवराय कसे परत पाठवत, हे फुले यांनी सांगितले आहे. आपल्या उच्च नैतिक वर्तनातून शिवरायांनी औरंगजेबाला लाजविले असे ते म्हणतात. (पृ. ६५).

म. फुले यांचे स्त्रीविषयक विचार नि कार्य हे प्रसिद्धच आहेत. याचे पडसाद या पोवाड्यातही उमटले

आहेत. नाटकशाळा, बहुपत्नीत्च व यातून निर्माण होणारा सवतीमत्सर या काही फुले यांना पटणा-या गोष्टी नव्हत्या. त्यांनी या सर्वांवर जिजाऊंच्या माध्यमातून टीका केलेली आढळते. (पृ. ५९).

पोवाड्यात एके ठिकाणी शिवाजीराजे एका संकटाच्या वेळी पत्नी सईबाईंचा सल्ला घेतात, असे दाखविले आहे. व तो सल्ला शिवाजीराजे मानतात, असेही लिहिले आहे. (पृ. ५०). यातून शिवरायांची स्त्रियांविषयीची उदार भूमिका प्रकट होते, असे फुले यांना वाटते.

**व्यक्तिगत गुणविशेष व जीवितकार्याचे स्वरूप :-**

पोवाड्याच्या शेवटच्या भागात फुले यांनी शिवरायांचे गुण सविस्तर वर्णन केले आहेत. त्यांच्या मते शिवराय हे एक ऊन, वारा, पावसाची तमा न करणारे योद्धे होते की, ज्यांनी यवनांना जेरीस आणले. संपत्तीचा त्यांना मोह नव्हता. योग्य ती वाटणी ते शिपायांना देत. त्यांचे सावधपण, कष्टाळूपणा, साधेपणा, युक्तिशीलता, विचारीपणा, रयतेला जीव लावणे, मधूर भाषण करणे. इ. गुण फुले यांनी सांगितले आहेत. (पृ. ७० - ७१). त्यांनी व्यंकोजीला लिहिलेल्या पत्रात ढोंग धतु-याचा त्याग करून प्रजापालन करण्याचा उपदेश शिवराय करतात, असे फुले दाखवून देतात. (पृ. ६९). शत्रूच्या कैद केलेल्या सैनिकांच्याही जखमा ब-या व्हाव्या म्हणून प्रयत्न करणारे ते दिलदार राजे होते. म्हणूनच शत्रूसैनिकही नंतर शिवरायांच्या पक्षात येत असे फुले म्हणतात. (पृ. ६५). त्यांच्या स्त्रीविषयक उदार भूमिकेविषयी वर लिहिलेच आहे.

जीवितकार्याविषयी सांगावयाचे तर शिवाजी हा एक महान शूद्र योद्धा असून तो देशासाठी लढतो, असे फुले यांना वाटते. पोवाड्याच्या आधी लिहलेल्या अभंगात ते तसा उल्लेख करतात. (पृ. ४०). देशावर आलेल्या मुस्लीम राज्यकर्त्यांच्या संकटातून शिवराय हिंदूंना मुक्त करतात, असे त्यांचे मत आहे. 'जिजी बाईचा बाळ, काळ झाला यवनांचा' असे ते पोवाड्यात म्हणतात. (पृ. ७१). तर अशा प्रकारे रयतेला मुस्लीम अत्याचारातून सोडविणे व रयतेसाठी अपार कष्ट करून रयतेला सुखी करणे हे महाराजांचे जिवितकार्य आहे, असे फुले यांना वाटते. त्यापैकी हा संघर्ष हिंदू - मुस्लीम असा होता, हे त्यांचे मत वस्तुस्थिती म्हणून कायम राहिलेले दिसते. मात्र मुस्लीम आक्रमणाचे हेतू व परिणामांविषयी त्यांचे मत नंतर बदललेले दिसते. त्याविषयी वर लिहलेलेच आहे. हा धार्मिक संघर्ष घडण्यात शिवाजीराजे फसवले गेले, असे नंतरच्या काळात त्यांचे मत बनलेले दिसते. मात्र शिवाजी महाराजांनी प्रजापालनात बजावलेली महत्त्वाची भूमिका व त्यांचे इतर गुण याविषयी त्यांची भूमिका स्थिर राहिलेली दिसते. त्यामुळेच त्यांच्या वाङ्मयात नंतरच्या काळातही शिवरायांचे आदरपूर्वक उल्लेख आलेले दिसतात.

**संदर्भ :-**

फडके य. दि. (संपादक, महात्मा फुले समग्र वाङ्मय, महाराष्ट्र साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई, आवृत्ती ५ वी, १९९१).



अनुक्रमणिका








# जुने लेखन
# कुणबी

कुणबीकीचीं अवजारें, जनावरें, खताचे प्रकार, शेतकुंपणें, कुणबी पोशीत असलेले बलुत्येआलुत्ये व भटक्ये यांची संख्या इत्यादींचा विचार केला म्हणजे आमची कुणबीक उमाप रानाच्या उदंड भरंशावर थाटली असावी अशी पाकळी बसते. "हेकड कुणबी वाटा मोडी" असें म्हटलें आहे. अव्वल इंग्रजींतल्या मराठी शाळेंत शिकलेल्या एका ऐंशी उलटलेल्या गृहस्थानें त्या वेळचा नीतिपाठ म्हणून दाखविला; तेव्हां 'ज्यानें त्यानें आपली जमीन वहीत करावी, आपल्या जमिनीबाहेर वहीत करूं नये,' अशी त्यांतील एक नीति त्यानें म्हणून दाखविली. यावरून हें उघड होतें कीं, पडितांत तर कुणबी नांगर फिरवीच पण वाटा मोडूनदेखील तो कोठेंही रान काढून वहीत करी. मुसलमानी व मराठी अमलांत जरी गांवची पहाणी होऊन मिरासदार, उपरी व त्यांच्या जमिनी ठरून गेल्या होत्या, तरी सुद्धां कमाल आकार बांधून काळी-पांढरी गांवचे दिमतीस दिल्यामुळें गांवांतल्या एखाद्या कुणब्याला काळी अजिबात नसली किंवा त्याच्या खटल्याला निपुर आली तर गांवकरी दुस-याच्या शेतांतून त्याला हरप्रयत्नानें जमीन मिळवून देत आणि त्याची व त्याच्या मुलाबाळांची बेबुदी करीत. पूर्वीच्या राजवटींत दर्याची व जंगलची अटक सैल होती आणि समुद्र व रान ह्यांवर सरकारी जाबता नव्हता असें म्हटलें तरी चालेल. नांगरापासून तों उंसाच्या चरकापर्यंत बहुतेक शेतीचीं हत्यारें व सनगें लाकडी आहेत आणि तीं नवीन किंवा दुरुस्त करितांना कुणब्याला सुतारलोहारांला लांकूडसरपण पुरवावें लागतें. कारूनारूंच्या हत्यारांतही इतर जिनसांपेक्षां लांकडाचा खप अधिक दिसून येतो. तेव्हां सर्वांनाच लाकडाचा पुरवठा पुष्कळ आणि थोडक्यात मिळण्याची सोय असली पाहिजे. सर्वत्र मुख्य खत गोवरांचे आहे. शेणकुरांचे मुबलक खत मिळण्याला पुष्कळ लक्ष्मी उर्फ गुरें बाळगलीं पाहिजेत. तीं सर्व शेताच्या मालावर जोगवणें अशक्य. "घरचा चारा आणि रानचा वारा" बरोबर नाहींत असे म्हणतात. इतक्या गुराढोरांना तोंड घालण्याला मोकळें जंगलच पाहिजे. शेतीला कुंपण कांटेरी झुडपांचे असतें. तीं सर्व वहिती जमिनींत मिळत नाहीत. तीं जंगलातून आणिलीं पाहिजेत. जंगलाशिवाय पुरेसें सरपण कोठें सांपडणार? महारांचे काम जमेदारांना जळण पुरविण्यांचें होतें व त्याबद्दल त्यांना भाकर किंवा जेवन मिळे. गु-हाळात चुलांगणाला महारानें सरपण पुरवावें व त्याबद्दल त्याला ऊंस, दोन ढेपा गूळ व शेवटचें आधण मिळतें. हें सरपण जर मालकाच्या शेताचेंच असतें तर महाराचा हक्क इतका मोठा नसता. अर्थात् महारांना काय आणि इतरांना काय जंगलांतून सरपण घेण्याची मनाई नव्हती. वारली, कातकरी वगैरे जंगली जाती 'जंगलात जाऊन सरपण, गवत आणणें, जंगलांतील कंदमुळें खाणें' असा आपला धंदा अजून सांगतात. त्याचप्रमाणे आजमितीला पहाडाचे आसपासचे शेतकरी व मजूर आपले घरांतला दाणा वाढला (संपला) म्हणजे जंगलांत जातात व झाडपाला, फळें, कंद आणून खातात. रासमाथ्याला बलुत्येआलुत्ये आणि अठरापगड भिकार हक्क म्हणा कीं भीक म्हणा मागून आज हजारों वर्षें आपली सालबेगली करून ठेवीत आहेत. कुणब्याला जर काळी इतकी कमी असती कीं, तिच्यांतून त्याची स्वतःची सालबेगमी निघणें दुरापास्त, तर ह्या वहिवाटीला कांही तरी आळा घालण्याचा प्रयत्न तो करता. भिका-यांच्या टोळधाडीमुळें आपल्या पोटावर पाय पडतो असें बलुत्याआलुत्यांना आढळतें तर निदान ते तरी त्यांना आडवे होते. ह्या सर्व गोष्टींवरून असें स्पष्ट होतें कीं, कुणबी थोडा व काळी फार असल्यामुळें बळीराजानें दुनियेचा भार उचलला. त्यानें वाटेल तेथें वाटेल तितकी काळी काढावी व पिकवावी, तिच्यासाठीं लागेल तो रानमाल उपसावा आणि हवी

तितकी लक्ष्मी बाळगावी, इतरांनींही वाटेल तसा रानपसारा आणि मीठ घ्यावं व कुणब्याच्या पोटांत पोट आणि घांसांत घांस काढावा; परंतु कोणीही - माणूस काय किंवा जनावर काय - उपाशीं मरूं नये अशी व्यवस्था ठरली. अव्वल इंग्रजींतही काळी फार व कुणबी थोडा अशी स्थिति होती आणि हें आंधळें गारूड पूर्वीप्रमाणेंच चाललें होतें. जमिनीची पैमाष झाली, मीठ-खातें निघालें आणि सरकारानें जंगल राखून ठेवलें, तेव्हांपासून कुणब्याचे व त्याजवर अवलंबून राहणा-या शेंकडो जंगली व भटकणा-या जातींचे हात पाय आंखडले. प्रपंच भागत नाहीं म्हणून वाटेल तेथें फुकट-फाकट किंवा वेळेला पैसे देऊनही वहीत करीन; आऊतकाठी, कुपाटी, राब, ताली, विहिरी, घरें वगैरेसाठीं जंगलांतून लांकूडफाटी, ढाळ्या, पाचोळा, गाटागोटा बिनपरवानगीनें अगर कर न देतां आणीन; किंवा मर्जीप्रमाणें जंगलांत गुरेंचारीन असें कुणबी आज म्हणेल तर चालत नाहीं. समुद्रकांठच्या किंवा जंगली जमाती म्हणतील कीं, मीठ किंवा रानमाल वाटेल तसा विकून पैसे करूं तर सोय नाहीं. पाश्चात्य कला वृद्धीमुळें पुरातन धंदे बहुतेक मोडले आणि जो उठला तो कुणबी बनला. शिवाय प्रजाही वाढली. त्यामुळें लागण करण्याजोगी बहुतेक नाकीर्दसार जमीन वहीत झाली आहे. तेव्हां हवी तितकी काळी, खारी आणि मोकळें रान हा जो आमच्या आडमापी कुणबिकीचा अनादि धर तो सुटला.

समुद्राची व जंगलाची बंदी झाल्यापासून त्यांची सर्व वर्दळ लागण जमिनीवर लोटली. सरपण हजारों वर्षें फुकट मिळत असल्यामुळें त्याच्या खर्चाचा सुमार कोणालाच राहिला नाहीं. आपल्या धंद्यासाठी व प्रपंचासाठी कुणबी आपापल्या शेतांतलीं झाडें तोडूं लागले. जळण विकत घेण्याची संवय नसल्यामुळें तमाम गांवकरी कुणब्या-जवळून तें मोहबतीनें मागून आणूं लागले. झाडें कमी होत होत गेलीं आणि त्या मानानें नवीन लागवड झाली नाहीं. त्यामुळे सरपणाला किंमत येऊं लागली. भील, रामोशी, महार, मांग वगैरे परपिंडलोलुपांना फुकट तोडून आणिलेलें सरपण विकण्याचा एक रोजगार झाला. होतां होतां गोंव-यांचा उपयोग खताकडे करण्याच्याऐवजीं कुणबी त्या जाळूं लागले आणि सर्व जाती कुणब्यांची गुरें सुटलीं कीं त्यांच्यामागें शेण धरण्याला आणि रानांत गोंव-या वेंचण्याला जाऊं लागल्या. शेत कुपाटी व चा-याचीही हीच कथा. खेड्याच्या सरकारी बंगल्याच्या कंपौंडांतील झाडांचा व गवताचा, सरकारी जागेवरील तरवडाचा व शेण्यांचा देखील लिलांव होतो. पण कुणब्याच्या तरवडकेकताडावर महारमांग ताव मारतात व त्याच्या शेतांत झुडूप दिसलें किंवा गवताचा ठोम उगवला कीं महारपोर व भिकार ते नेतें. वास्तविकपणें गायरानें, गांवचारण, शेताच्या बाजूच्या रस्त्याच्या कडा ह्यांवर कुणब्याचा अग्र हक्क; परंतु गांवचे सर्व अडाणी व भटकणारे लोक आपलीं जनावरें मोकाट सोडतात आणि कुणब्यांच्या जनावरांच्या वांट्याला तेथील गवत येऊं देत नाहींत. पट्टी भरतो कुणबी आणि वरिष्ठ जाती शिवाय करून सर्व बलुत्येआलुत्ये व भटक्ये त्याच्या शेतांतलें गवत-बाटूक काढतात, रात्रीं चोरतात आणि त्यावर आपलीं गुरें पोसतात किंवा त्याचे टक्के करितात. गाढवा-डुकरांना कधीं दावें नसतें व त्यांना उचलून चारा कोणी टाकीत नाहीं. त्यामुळें परीट, कुंभार, पाथरट, वैदु वगैरेंची गाढवें आणि वडार, कोल्हाटी यांचीं डुकरें ह्यांची शेतांना नेहमीं वर्दळ लागते. तेव्हां आज स्थिति अशी आहे कीं, कुणबी ओरडतो माझे बैल उपाशीं मरतात. १०-२० रुपये शेंकड्याप्रमाणें मला कडबा विकत घ्यावा लागतो, दोन दोन कोस पायपीट केली तरी कु-हाडीच्या दांड्याजोगें सरळ किंवा हळसाजोगें बांकदार लांकूड भेटत नाहीं आणि बाकी सर्व दुनिया शेतांतील चारा, तरवड, केकताड, फांटी, फुकट म्हणून बेसुमार लुटते, नव्हे कनिष्ठ जाती त्याचे पैसे करतात आणि हा कपाळ झोडतो कीं, चा-यासरपणाचा दुष्काळ पडला. मुलकी खात्याचा ठराव नंबर ५ तारीख २-१-१९१३ अन्वयें मुंबईसरकार लोकांना सवलती देऊन झाडें लावण्यास उत्तेजन देत आहे. चा-याचा संचय कसा करावा हें कोडें उकलण्यांत सरकार व लोक गुंतले आहेत. परंतु जोंपर्यंत कुणब्याच्या मागचे हे भुंगे तोडून काढले नाहींत, तोंपर्यंत सरकारच्या व लोकांच्या प्रयत्नाला ह्या कामीं यश येणार नाहीं.

अनुक्रमणिका






यावें कसें? जमिनीच्या बाहेर अंकुर येण्याचा उशीर कीं तो खुडलाच. मना करावें तर जाळ सुडी, मार जनावर असल्या नुकसानीला पाचारण करावें. जोंपर्यंत अशी स्थिति आहे तोपर्यंत कुणब्यानें तरी काय करावें? आणि चा-याचा व जनावरांचा संग्रह कसा करावा व त्यांचा विमा उतरण्याला तरी कोणीं पुढें यावें? आतां काळी आंखली आहे आणि वाटेल तेथें रान काढण्याला कुणब्याला मार्ग नाहीं. वांटणीमुळें शेताच्या चिंधोट्या चिंधोट्या झालेल्या आहेत. तेव्हां सबंध दुनियेच्या पोषणाचें ओझें कुणब्याला झेंपेनासें झालें आहे. आणि "एक बळी हजार छळी" असें तो पाण्याच्या दर घोटास कूरकुरतो. पाटील-कुळ-कर्ण्याचे ऐन जिनसी हक्क वजा केले, तसे महारजागल्यांचे सरकारनें केले नाहींत. त्यामुळें कुणब्यांना सबंध महारवाडा, रामोसवाडा, भिलाटी, कोळवण, मांगवण पोसावें लागतें. आम्ही सरकारचें काम करितों असें, म्हणून कुणब्याच्या बोकांडीं बसून हे लोक त्याला लोळवितात. तसेंच दरसाल हजारों भिकार सहपरिवार कूणब्याला पोसावें लागतें. समुद्र, जंगल सुटें होतें, हत्यारांची मनाई नव्हती, तेव्हां हे लोक व भटक्ये जंगलावर, शिकारीवर व मिठावर थोडें फार पोट काढीत आणि पिकांना व ढोरांना उपद्रव करणा-या पांखराजनावरांचा संहार करीत! जंगलकाळी आंखून कुणब्याला डांभले त्याच वेळेला ह्या सर्वांना डांभून टाकावयास पाहिजे होतें. तसें न झाल्यानें कुणब्याच्या आयातीला मात्र बांध पडला; परंतु निर्गत कायम- नव्हे - जास्त वाढली. कूणबी म्हणत असतो कीं, पृथ्वीचा एक कोंपरा पिकला आणि तीन खकाण राहिले म्हणजे सगळ्या भोरड्या पिकलेल्या भागावर आदळतात. तशी त्याची गति झाली आहे आणि माणसांजनावरांची सर्व खार्तीं-तोंडें शेतांवर येऊन पडलीं आहेत.

(**टीप** : 'गावगाडा' या त्रिं. ना. आत्रे यांनी १९१५ साली लिहिलेल्या पुस्तकातून.)





अनुक्रमणिका







## लेखकांचा परिचय

 **मुखपृष्ठावरील चित्र :**

**चित्रकार -** जितेंद्र अशोक साळुंखे,

**पत्ता :-** मल्हारपुरा, मूक-बधिर विद्यालयामागे, चोपडा, जिल्हा जळगाव - ४२५ १०७.

भ्रमणध्वनी : ९९७०७८३४०५.

 **प्रा. श्री. मा. भावे**

माजी प्रपाठक व विभागप्रमुख, गणित विभाग, नौरोजी वाडिया कॉलेज, पुणे; गणित व तत्त्वज्ञान या विषयांत पीएच. डी. व पदव्युत्तर संशोधन; शिक्षकचळवळीत सहभाग; शिक्षण, गणित व तत्त्वज्ञान या विषयांवर २५ शोधनिबंध.

**पत्ता :-** ३३/२०, ४ थी गल्ली, प्रभात रोड, पुणे - ४११००४.

दूरध्वनी :- (०२०) २५६७४०९३.

 **श्री. के. वनपाल**

श्री. वनपाल यांनी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची परीक्षा देऊन मामलेदार म्हणून नोकरीस सुरुवात केली व पदोन्नती मिळवत ते महसूल खात्याच्या सचिव पदावरून निवृत्त झाले. शेती, शेतकरी व त्यांचे अर्थकारण याची त्यांना तृणमूल स्तरावरून माहिती आहे.

**पत्ता :-** अ-८, रे-व्हेन्यू को. ऑ. हाऊसिंग सोसायटी, गणेशखिंड रस्ता, आय्-सी-एस् कॉलनी. पुणे ४११ ००७.

दूरध्वनी - ०२०-२५५३२१४३, भ्रमणध्वनी : ९९२२५०१४६४.

 **प्रा. डॉ. सुधीर रसाळ**

मराठी विषयाचे प्राध्यापक (निवृत्त). डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद. मराठी काव्याचे थोर अभ्यासक. 'नवभारता'च्या संपादक मंडळाचे सभासद.

***पत्ता :*** १००, श्रेयनगर, नवा उस्मानपुरा, औरंगाबाद ४२१ ००५. दूरध्वनी : २३३८१३४.

 **प्रा. डॉ. अशोक कृष्णाजी जोशी**

इंग्रजी या विषयाचे प्राध्यापक (निवृत्त.) गोवा विद्यापीठ. सौंदर्यशास्त्र, समीक्षा, तत्त्वज्ञान या विषयांचे अभ्यासक.

**पत्ता**:- बी १ व्यंकटेश रिव्हिएरा, शाहू कॉलनी, गल्ली नं.२, कर्वेनगर, पुणे ४११ ०५२

भ्रमणध्वनी : ९४२२०६४९७५.

 **प्रा. शिल्पा शेटे.**

श्री. पद्ममणि जैन महाविद्यालय पाबळ, ता. शिरूर, जि. पुणे.

मो. नं. ९९६०७१८२२६

इ. मेल. shilpasrujan@rediffmail.com

● **संपाकीय टीप** : श्रीमती माणिक खेर यांच्याविषयी फेब्रुवारीच्या अंकात दिलेली माहिती चुकीची आहे त्याचा खेद होतो. श्रीमती माणिक खेर यांनी मुंबईतील टाटा इन्स्टिट्युट ऑफ सोशल सायन्सेस येथून शिक्षण पुरे केले. सध्या त्या पुणे विद्यापीठात यु. जी. सी. रीसर्च सायंटीस्ट म्हणून काम करतात.

अनुक्रमणिका

## आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६९ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदान-प्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारत' ने कार्य करीत राहावे असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित-वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारत' पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयातील ग्रंथालयात अद्ययावत् पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयातून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांना आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारत'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारत'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारत' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रु. ४००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारत'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

– संपादक मंडळ

## लेखकांस आवाहन

नवभारत मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण नवभारतकडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी अशी विनंती आहे.

१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.

२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यासह द्यावेत.

३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही याची स्पष्ट कल्पना नवभारतच्या संपादकांना द्यावी.

४. नवभारतमध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात नवभारतमध्ये येईल किंवा येणार नाही हे यथावकाश कळविले जाईल याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.

आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.

– संपादक मंडळ

आपल्या ग्रंथालयात अवश्य हवीत अशी

**प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमालेची**

संग्राह्य वैचारिक मराठी प्रकाशने

**सुधारित किंमत १ ऑगस्ट २०१६ पासून लागू**

- ◈ **वैदिक संस्कृतीचा विकास** (तिसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी - - - ५०० रु
- ◈ **अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर** (पूर्वार्ध) । ब्र. स्वामी केवलानंद सरस्वती - - - ३०० रु
- ◈ **पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास** । डॉ. सुमंत मुरंजन - - - २०० रु
- ◈ **हिंदी साहित्यविचार** । प्रा. प्यारेलाल गोहेल - - - ५० रु
- ◈ **श्री. यशवंतराव चव्हाण अभिनंदन ग्रंथ** - - - १०० रु
- ◈ **संशोधन साधना** । डॉ. वसंत स. जोशी - - - १०० रु
- ◈ **आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास** । ऋग्वेदी - - - ३०० रु
- ◈ **वागीश्वरी** । डॉ. गो. के. भट - - - ७५ रु
- ◈ **गिर्यारोहण परिचय** । अच्युत खोडवे - - - ५० रु
- ◈ **इतिहासाचे तत्त्वज्ञान (दुसरी आवृत्ती)** । सदाशिव आठवले - - - २०० रु
- ◈ **शाहीर हैबती** । डॉ. शिवाजीराव चव्हाण - - - ५० रु
- ◈ **गीताचिकित्सा** । भाऊ धर्माधिकारी - - - २०० रु
- ◈ **तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी (चरित्र)** । सौ. मालती देशपांडे - - - ५० रु
- ◈ **बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार** । प. ल. वैद्य - - - ७० रु
- ◈ **हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन (संबंधित दु. आ.)** । मे. पुं. रेगे - - - २०० रु
- ◈ **पाच पुस्तक-परीक्षणे** । वा. म. कुलकर्णी - - - १०० रु
- ◈ **भेदविलोपन : एक आकलन** । अशोक केळकर - - - ६० रु
- ◈ **कॉलिंगवुडची कलामीमांसा - एक भाष्य** । रा. भा. पाटणकर - - - १५० रु
- ◈ **धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार** । दि. के. बेडेकर - - - १०० रु
- ◈ **तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, कार्य आणि विचार** - - - २०० रु
- ◈ **इहवाद आणि सर्वधर्मसमभाव** । मे. पुं. रेगे - - - २०० रु
- ◈ **प्राज्ञपाठशाळा आणि तिची परंपरा** - - - २५० रु
- ◈ **चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान (तृतीयावृत्ती)** । सदाशिव आठवले - - - २०० रु
- ◈ **विनोबांची संस्कृत साम्यसूत्रे (रसग्रहणात्मक मराठी अनु.)** । वसंत नारगोलकर - - - २०० रु
- ◈ **नागरी समाज, राज्यसंस्था आणि लोकतंत्र : भारतीय संदर्भात विवेचन**। द. ना.धनागरे - - - ७० रु
- ◈ **प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती** । डॉ. म. अ. मेहेंदळे - - - ७०० रु
- ◈ **हिंदुधर्माची समीक्षा आणि सर्वधर्मसमीक्षा**। (दु. आ.) : तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी - - - ३०० रु
- ◈ **पाश्चात्त्य नीतिशास्त्राचा इतिहास** । (दुसरी आवृत्ती ) : प्रा. मे. पुं. रेगे. - - - २५० रु
- ◈ **साहित्याचे तर्कशास्त्र** । संपादक : सीताराम रायकर, द. दि. पुंडे, पंडित टापरे. - - - ८०० रु

१) ग्रंथालये व संस्थांना किंमतीत १० टक्के सूट. पोस्टेजचा खर्च वेगळा पडेल. २) व्ही. पी. ची पद्धत नाही.

३) पैसे मनिऑर्डरने वा ड्राफ्टने पाठवावेत.

संपर्कासाठी पत्ता : चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२८०३ (जि. सातारा) फोन : (०२१६७) २२००६

हे मासिक प्रा. यशवंत कळमकर यांनी सन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.




